## या पुस्तकांत—

—भारतीय इतिहासाच्या दृष्टीनें अपरंपार महत्त्व असलेल्या दाशराज्ञ युद्धाचें संशोधनात्मक विवेचन केलेलें आहे. दाशराज्ञ युद्ध हें हिंदुस्थानांतील इतर अनेक युद्धांप्रमाणें वायव्यसीमा ओलांडून भारतावर स्वारी करणारे परकीय आणि तत्कालीन भारतीय रहिवासी यांच्यामध्यें झालें. इराणी सम्राट चायमान या, बाबिलोनियापासून भारतवर्षापर्यंतच्या विस्तीर्ण साम्राज्याचा अधिपति असलेल्या, एका बलाढ्य परकीयानें भारतावर आक्रमण केलें; परंतु तत्कालीन भारतीय राजा पांचालाधिपति सुदास यानें चायमानाचा परुष्णी (रावी) नदीच्या कांठीं पूर्ण निःपात केला. या युद्धापासून कुरु आणि पांचाल या उभयतांमधील भीषण कहलांचा प्रारंभ होतो. दाशराज्ञ युद्धांत भारतांतील सुदास राजाचा पराभव झाला असता तर इराणाप्रमाणेंच भारतवर्षहि जरथुस्त्राचा अनुयायी बनला असता. भारतीय संस्कृतीचें त्या आपत्तीपासून रक्षण करणाऱ्या सुदास राजाच्या महत्तम कामगिरीची चर्चा या ग्रंथांत आहे. तसाच हिंदी-सुमेरी संस्कृतीच्या एकात्मतेचा अभिनव पुरावाहि येथें प्रकाशांत आणलेला आहे. ऋग्वेदकालीन संशोधन - वाङ्मयांत या ग्रंथाला अवश्य स्थान राहील.

अ. ज. करंदीकर

# दाशराज्ञ युद्ध

## ऋग्वेदकालावरील संशोधनग्रंथ



मङ्गल साहित्य प्रकाशन, पुणें ४

जनासो अग्निं दधिरे सहोवृधं विधेम ते।
स त्वं नो अद्य सुमना इहा–विता वाजेषु सन्त्य ॥

— ऋग्वेद

— दर्पदमन-सामर्थ्यांची वृद्धि करणारा जो अग्नि त्याची भक्तजनांनीं वेदीवर संस्थापना केली आहे. त्यास हवि अर्पण करून आम्हींही त्याला प्रकट व्हावयास लावूं. हे सत्प्रतिपालका-अग्निदेवा, पराक्रमाच्या कृत्यांत आमचा तूं प्रसन्न अंतःकरणानें संरक्षणकर्ता हो.



आवृत्ति पहिली
कापडी बांधणी
मूल्य रु. २/८

प्रकाशन : २६
श्रावण सं. २००२







मङ्गल साहित्य प्रकाशन :
संचालक : अमरेन्द्र गाडगीळ
अनुशासक : (१) दि. वि. काळे एम्. ए., (२) हेमाग्रज.

प्रकाशिका
सौ. मङ्गल अमरेन्द्र गाडगीळ
मङ्गल साहित्य प्रकाशनाकरतां
आनन्दचेम्बर्स, आम्बराई, पुणें ४

मुद्रक
अमरेन्द्र लक्ष्मण गाडगीळ
'अग्रणी मुद्रणालय'
आनन्दचेम्बर्स, आम्बराई, पुणें ४

# प्रस्तावना

दुसऱ्या महायुद्धाचा इतिहास लिहीत असतांना मी एकाएकीं ऐतिहासिक कालाच्या प्रारंभीं घडलेल्या आणि ज्याच्याविषयीं समकालीन माहिती उपलब्ध आहे अशा युद्धांतील अगदीं पहिल्या युद्धाच्या इतिहासाकडे कां वळलों, हें प्रथम सांगितलें पाहिजे.

१९४५ च्या प्रारंभीं ' दुसरी आघाडी ' प्रसिद्ध झाल्यानंतर एके दिवशीं मी स्टॅलिनचें चरित्र वाचत होतों. त्या चरित्रांत अचानक असा उल्लेख आढळला कीं कॉकेशस प्रांतांतील कुरु नदीच्या खोऱ्यांत स्टालिनचा जन्म झाला आहे. हा उल्लेख पाहतांच तें पुस्तक मिटलें आणि महाभारतांतील कुरुकुल कॉकेशसमधील कुरु नदीच्या खोऱ्यांतून भारतवर्षाकडे आलें कीं काय, या प्रश्नाची चिकित्सा आरंभिली. या प्रश्नासंबंधीं माझें निश्चित मत ठरल्यानंतर कुरूंच्या भारतांतील आगमनावर ' महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकें 'त गतवर्षी एक लेख लिहिला. या लेखांतच दाशराज्ञयुद्धाच्या काळीं कुरूंनीं भारतांत प्रथम प्रवेश केला असावा, ह्या कल्पनेचा उल्लेख केला होता. यामुळें कुरूंच्या भारत-प्रवेशाचा इतिहास समजून घेण्याकरतां दाशराज्ञयुद्धाच्या इतिहासाचा अभ्यास करणें प्राप्त झालें.

दाशराज्ञयुद्ध हें हिंदुस्थानांतील इतर अनेक युद्धांप्रमाणें वायव्य-सीमा ओलांडून भारतावर चालून येणारे परके लोक आणि भारतवर्षांतील

तत्कालीन रहिवासी यांच्यामध्यें झालें. या प्रसंगीं स्वारी करणारा पार्थव सम्राट् चायमान हा बाबिलोनियापासून भारतवर्षापर्यंतच्या विस्तीर्ण साम्राज्याचा अधिपति होता. त्याचा प्रतिकार करणारा सुदास राजा हा प्राचीन इतिहासांतील सुप्रसिद्ध अशा पांचाल कुलाचा अधिपति होता. या उभयतांच्या युद्धांतील निर्वाणीची लढाई परुष्णी नदीच्या म्हणजे अर्वाचीन रावी नदीच्या कांठावर झाली. या युद्धांत चायमान परुष्णी नदीच्या लोंढ्यांत बुडून मेला आणि भारतसंरक्षक सुदास राजाला अभूतपूर्व विजय मिळाला. या विजयाचे राजकीय परिणाम भारतीय इतिहासांतील पृथ्वीराजप्रभृतींच्या विजयासारखेच झाले. म्हणजे या विजयानें सुदासाचा अहंकार अतिशय वाढला. त्याचें त्याच्या पुरोहिताशीं म्हणजे वसिष्ठाशीं वांकडें आलें. पुढें वसिष्ठ हा सम्राट् चायमानाचे प्रमुख साहाय्यकर्ते जे कुरु, त्यांना जाऊन मिळाला आणि त्या उभयतांनीं मिळून सुदासाला जिंकून त्याचा बहुधा पृथ्वीराज केला असावा ! कारण 'मनुस्मृतीं'त सुदास राजाचा अहंकारामुळें सर्वनाश झाल्याचा उल्लेख आढळतो.

भारतीय इतिहासाच्या दृष्टीनें दाशराज्ञ युद्धाचें महत्त्व अपरंपार आहे. या युद्धापासूनच कुरु आणि पांचाल या उभयतांमधील भीषण कलहांचा प्रारंभ होतो. या कलहांची समाप्ति भारतीय युद्धांत पांचालांनीं कौरवांवर मिळविलेल्या अंतिम विजयानें होते. कुरु आणि पांचाल हे वंशपरंपरेनें परस्परांचे वैरी होते, हा त्यांचा पूर्वेतिहास समजल्यानें महाभारतांतील ऐतिहासिक भाग अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागतो. पण त्या प्रश्नाची चर्चा करण्याला येथें सवड नाहीं.

दाशराज्ञ युद्धाचा भारतीय इतिहासावर सर्वांत चिरस्थायी परिणाम धार्मिक क्षेत्रांत घडून आला. त्या युद्धांत सुदास राजाचा पराभव घडून आला असता तर इराणाप्रमाणेंच भारतवर्षहि जरथुस्त्राचा अनुयायी

बनला असता. मग सनातन वैदिक धर्माला जगांत कोठेंहि आसरा उरला नसता. भारतवर्षानें जरथुस्त्राचें अनुयायित्व स्वीकारिलें असतें तर ग्रीकांच्या आक्रमणाला किंवा इस्लामी आक्रमणाला त्यानें इराणांतील जरथुस्त्राच्या अनुयायांहून अधिक यशस्वी प्रतिकार केला असता असें निदान मला तरी वाटत नाहीं. भारतवर्षाची आणि भारतीय संस्कृतीची परकीय आक्रमणांना प्रतिकार करण्याची, त्याचप्रमाणें कालांतरानें कां होईना पण त्यांचा संपूर्ण निःपात करण्याची शक्ति, जर अद्यापि जिवंत असली तर तिच्याबद्दल आपण सुदास राजाचे ऋणी आहोंत.

प्रस्तुत प्रबंधांत हिंदीसुमेरी संस्कृतीच्या एकात्मतेचा अभिनव पुरावा मी प्रकाशांत आणला आहे. याच विषयावरील, बडोद्याचे सुप्रसिद्ध विद्वान् श्री. दा. ना. आपटे यांचा ‘ हिंदीसुमेरी संस्कृति ’ हा ग्रंथ ज्यांनीं वाचला असेल, त्यांना त्या पुराव्याचें महत्त्व सहज समजून येईल. भारतांत अद्यापि विद्यमान असलेल्या अत्रिकुलाचा सुमेरच्याच काय, पण ग्रीसच्याहि इतिहासाशीं किती निकट संबंध आहे, हें पाहिलें म्हणजे केवळ अत्रींचाच एक स्वतंत्र इतिहास लिहितां येईल, असें वाटतें. अत्रींप्रमाणेंच आंगिरस, वसिष्ठ आणि विश्वामित्र या कुळांसंबंधीं अगदीं अभिनव माहिती या प्रबंधांत आली आहे. जरथुस्त्री लोकांनीं केलेला आंगिरसांचा छळ, वसिष्ठांचे शतपुत्र नाश पावण्याच्या प्रसंगाशीं असलेला जरथुस्त्राचा संबंध आणि त्याकरतां जरथुस्त्राची हत्या करून वसिष्ठ कुळानें घेतलेला सूड, या प्रसंगांची प्रस्तुत प्रबंधांतील माहिती मुंबईच्या पारशी विद्वानांना अतिशय महत्त्वाची वाटेल. पण त्यांच्यांत मराठी जाणणारे कोणी विद्वान आहेत कीं नाहींत हें माहीत नसल्यानें मला त्यांचा अभिप्राय आधीं मिळवितां आला नाहीं. या प्रबंधाच्या शेवटीं वेदकालाची चर्चा करितांना अवेस्त्याच्या आणि जरथुस्त्री पंथाच्या महाभारतांवर झालेल्या प्रभावाची माहिती सांगितली आहे, तीसुद्धां

त्यांना उपयुक्त वाटेल. याव्यतिरिक्त आणखी किती तरी महत्त्वाचे विषय यां प्रबंधांत आले आहेत. त्यांचा येथें उल्लेखसुद्धां करणें शक्य नाहीं.

ह्या प्रबंध लिहिण्याचें साहस मी मुख्यतः डॉ. अनंतराव करमरकर यांच्या आग्रहामुळें केलें. दाशराज्ञ-युद्धाच्या चिकित्सेला प्रारंभ करण्या-पूर्वी मला वेदांच्या नुसता परिचयसुद्धां नव्हता, हें सांगितलें म्हणजे माझ्या साहसाची विद्वानांना पुरती कल्पना येईल. पुढें डॉ. करमरकर पुणें सोडून भारतीय विद्याभुवनांत प्रविष्ट झाल्यानंतर माझे जुने मित्र डॉ. हर्षे यांच्या टोंचणीमुळें मला हें काम अर्धवट सोडून देतां आलें नाहीं. या विषयींची चर्चा रावबहाद्दूर दीक्षित, डॉ. गोखले, डॉ. दांडेकर यांच्यासारख्या विद्वानांच्याबरोबर केव्हां केव्हां करितां आली. त्या वेळीं त्यांनीं घेतलेल्या आक्षेपांचा उपयोग विषयाची मांडणी करितांना मी करून घेतला आहे. कलकत्ता विद्यापीठाचे डॉ. सुनीतिकुमार चट्टोपाध्याय यांच्याशींहि एकदां तासभर चर्चा करण्याची संधि मिळाली. तेव्हां त्यांनीं घेतलेल्या आक्षेपांना उत्तरें देण्याकरतां या प्रबंधाचीं पानें वाढवावीं लागलीं आहेत. अशा प्रकारें अधिकारी विद्वानांचे कांहीं आक्षेप आधींच समजून घेऊन त्यांना उत्तरें देण्याचा प्रयत्न केला असला तरी प्रत्यक्ष पुस्तक हातीं पडल्यानंतर आणखी आक्षेप निघतीलच. त्यांचा या पुस्तकाचें इंग्रजी रूपांतर करितांना उपयोग होईल. कारण या विषयाचा माझा अभ्यास सध्यां स्थगित झाला असला तरी तो संपूर्ण झाला नाहीं, याची मला अतिशय चांगली जाणीव आहे.

सवडीच्या अभावीं मुद्रितें तपासतां न आल्यानें या पुस्तकांत मुद्रणदोष बरेच राहून गेले आहेत. ते शक्य तर स्वतःच सुधारून वाचकांनीं पुस्तक वापरावें, अशी विनंति करण्यांवाचून गत्यंतर नाहीं.

सरतेशेवटीं एक वैयक्तिक उल्लेख केल्यावांचून मला राहवत नाहीं. माझ्या संस्कृताच्या शिक्षणाचा प्रारंभ 'नूतन मराठी विद्यालयां'त

गुरुवर्य नाना गोखले यांच्या हाताखालीं झाला आणि त्यांच्याइतके चांगले संस्कृताचे शिक्षक मला अन्य कोणी भेटले नाहींत. वेदांसारख्या अवघड विषयावर लिहिणाऱ्या अन्य विद्वानांनीं आपल्या युरोपीय गुरूंचा उल्लेख केला आहे. पण गुरुवर्य नाना गोखले यांच्यासारख्या कायावाचा-मनानें भारतीय असलेल्या शिक्षकांकडून आपल्या प्राचीन संस्कृतीची गुरुकिल्ली लाभली, याचा मला अभिमान वाटतो.

अ. ज. करंदीकर
आषाढस्य प्रथमदिवसे, शक १८६८

# अनुक्रमणिका

| प्रकरण | : पृष्ठ |
|---|---|
| दाशराज्ञयुद्धाची पूर्वपीठिका | १ |
| वसिष्ठ आणि जरथुस्त्र | ३५ |
| इराण, तुराण आणि हिंदुस्थान | ५४ |
| चायमानाची भारतवर्षावर स्वारी | ७२ |
| पांचाल सुदास आणि त्याचे सहकारी | ८२ |
| परुष्णीची लढाई | ९४ |
| ऋग्वेदसमाप्तीचा काळ | १०३ |

# दाशराज्ञयुद्धाची पूर्वपीठिका

दाशराज्ञयुद्धापासून भारतीय आर्यांच्या इतिहासाचा प्रारंभ होतो. पण नवलाची गोष्ट अशी कीं आजपर्यंत या युद्धाचा इतिहास कोणत्याहि देशी किंवा विदेशी विद्वानांनीं लिहिलेला नाहीं. अगदीं नाहीं म्हणायला मराठींत ज्ञानकोशकारांनीं ' बुद्धपूर्व जग ' या ग्रंथांत दाशराज्ञयुद्धासंबंधीं बरीच चर्चा करून ऋग्वेदाची रचना बहुतांशीं त्या युद्धानंतर झाली असावी, असा सिद्धांत प्रस्थापित केला आहे. तरी सुद्धा प्रत्यक्ष दाशराज्ञयुद्ध चा त्यांना उलगडा करतां आला नाहींच. मात्र त्यांचाच ग्रंथ चाळतांना मला त्या युद्धाचें कोडें उकलण्याची शक्यता दिसूं लागली, हें कृतज्ञपणें प्रस्तुत प्रबंधाच्या प्रारंभीच सांगितलें पाहिजे.

दाशराज्ञयुद्धांत एका पक्षाचा नेता सुदास राजा होता आणि त्याच्या कुळांत किंवा आप्तांत सृंजय, दैववात, अतिथिग्व, दिवोदास इत्यादि वीर नुकतेच होऊन गेले होते, या माहितीविषयीं वेदविदांचें एकमत आहे. पण सुदासाच्या शत्रुपक्षाचा नेता कोण होता, याचा त्यांनीं कधींच विचार केला नाहीं. सहाव्या मंडलांतील बार्हस्पत्य भरद्वाजकृत २७ व्या सूक्ताची चिकित्सा केली असतां या प्रश्नाचें उत्तर सहज मिळण्याजोगें आहे.

वधीदिंद्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन् ।
वृचीवतो यद्धरियूपीयायां हन्पूर्वे अर्धे भियसापरो दर्त् ॥५॥
त्रिंशच्छतं वर्मिण इंद्र साकं यव्यावत्यां पुरुहूत श्रवस्या ।
वृचीवंतः शरवे पत्यमानाः पात्रा भिंदाना न्यर्थान्यायन् ॥६॥

यस्य गावा वरुषा सूयवस्यू अंतरू षु चरतो रेरिहाणा ।
स सृंजयाय तुर्वशं परादाद् वृचीवतो दैववाताय शिक्षन् ॥७॥
द्वयाँ अग्ने रथिनो विंशतिं गा वधूमतो मघवा मह्यं सम्राट् ।
अभ्यावर्ती चायमानो ददाति दूणाशेयं दक्षिणा पार्थवानाम् ॥८॥

या अवतरणावरून व्यक्त होणारी पहिली महत्त्वाची गोष्ट ही कीं अभ्यावर्ती चायमान हा पार्थव सम्राट् होता आणि सृंजयदैववातासारखे भारतीय राजे त्याचे अंकित म्हणून त्याच्या शत्रूंना जिंकीत होते. चायमानानें वरशिखांचा संहार केला, दैववातानें वृचीवंतांच्या तीन सहस्र चिलखती सेनेला धूळ चारली आणि तुर्वशाला सृंजयानें युद्धबंदी केलें, इतक्या घटनांचा या अवतरणांत उल्लेख आला आहे. या साऱ्या लढाया मध्य आशियांत झाल्या असाव्यात, असें मानण्याला पुरेसे पुरावे आहेत. त्यांचाच पहिल्याप्रथम विचार करणें आवश्यक आहे.

वरील अवतरणांत आढळणाऱ्या अपरिचित नांवांमध्यें अभ्यावर्ती हें नांव सर्वांत महत्त्वाचें आहे. पार्थव सम्राट् चायमानाला हें नांव लागलें असल्यानें या नांवाची उपपत्तिहि पार्थियांतच शोधली पाहिजे. पण कांहीं नामांकित विद्वानांनीं हा शोध करण्याचा उपद्रव टाळण्याकरितां सृंजय, दैववात आणि अभ्यावर्ती चायमान हीं सारीं एकाच व्यक्तीचीं नांवें ठरविलीं आहेत. कलकत्त्याचे एक विद्वान् श्री. उपेंद्रनाथ घोसाळ आपल्या 'वेदांतील ऐतिहासिक परंपरा' या लेखांत लिहितात:

'King Abhyavartin Cayamana is identified by some with the Srinjaya King Daivavata mentioned in the same context.' (Beginnings of Indian Historiography P. 27) या समीकरणाला बहुधा 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' याच सुप्रसिद्ध सूत्राचा आधार असावा ! विश्वविद्यालयांतील विद्वानांनीं वेदावर सध्या जे अत्याचार चालविले आहेत, त्यांचा हा एक अगदीं सौम्य नमुना आहे. असले अनेक नमुने या प्रबंधांत वाचकांच्या दृष्टीला आणावे

लागतील. असो, ढोबळ रीतीनें बोलावयाचें म्हणजे पूर्व इराणांतील ज्या प्रांताला सध्या खुरासान ही संज्ञा आहे, त्याच प्रांताला प्राचीन काळीं पार्थिया म्हणत असत. बार्बी द् मेनार या फ्रेंच लेखकाच्या इराण देशाच्या भौगोलिक कोशावरून असें समजतें, कीं अत्यंत प्राचीनकाळीं खुरासानच्या एका बावर्द नांवाच्या राजानें अबीवर्द प्रांत सम्राट् कैकाउसला दिला आणि त्यानें त्या प्रांतांत अबीवर्द नगराची स्थापना केली, अशी इराणांत ऐतिहासिक परंपरा आहे. याच नांवाचे ग्रीक लेखकांनीं अपवर्त किंवा अपोवर्त असे अपभ्रंश केले आहेत. बेहिस्तून येथील सुप्रसिद्ध शिलालेखाच्या शक भाषेंतील प्रतींत हेंच नांव अवर्ती किंवा अफर्ती या स्वरूपांत आढळतें. या सर्व माहितीवरून असा निष्कर्ष निघतो कीं अभ्यावर्ती हें पार्थियांतील एका प्रमुख नगराचें आणि टोळीचें नांव होतें. दाशराज्ञयुद्धाच्या काळीं या अभ्यावर्ती चायमानाचें साम्राज्य बाबिलोन नगरीपासून भारतवर्षापर्यंतच्या विस्तीर्ण प्रदेशावर पसरलेलें होतें. प्राचीनकाळच्या परिस्थितीप्रमाणें या साम्राज्यांत वेळोवेळीं बंडें उद्भवत आणि त्या बंडवाल्यांना साम्राज्याबाहेरील साहसी टोळयांचें सहायहि मिळे. अशाच एका प्रसंगाचा वरील अवतरणांत उल्लेख आलेला आहे. त्याचा आतां उलगडा केला पाहिजे.

'वधीदिंद्रो वरशिखस्य शेषः अभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन्' या वचनाचा उलगडा करण्यापूर्वी एक महत्त्वाची गोष्ट अर्वाचीन वाचकांच्या दृष्टीस आणिली पाहिजे. ती ही कीं वेद ज्याप्रमाणें अपौरुषेय आहेत, त्याप्रमाणेंच वेदकालीन लोकांचीं सारीं महत्त्वाचीं कृत्यें अपौरुषेयच असत. कोणतेंहि महत्त्वाचें कृत्य आपल्या हातून घडून येणें हें ईश्वरी कृपेवर अवलंबून असतें, या वस्तुस्थितीची वेदकालीन लोकांना अतिशय चांगली जाणीव असल्यामुळें 'अभ्यावर्ती चायमानाला युद्धशास्त्राचा पाठ देण्याकरितां इंद्रानें वरशिखांच्या संततीचा संहार केला' असे उद्गार मंत्रद्रष्ट्यांच्या तोंडून स्वाभाविकपणें बाहेर पडतात. या

मनोवृत्तीवर प्रकाश पाडणारी एक अतिशय समर्पक कथा महाकवि फिर्दूसीच्या शहानाम्यांत आढळते. इराणांत फार प्राचीनकाळीं जमशीद नांवाचा राजा होऊन गेला. याच्या राजवटींत इराणी लोकांना अक्षरशः रामराज्याचें सौख्य भोगावयाला मिळत होतें. पण त्याच्या आयुष्याच्या उत्तरार्धांत तो म्हणूं लागला, कीं माझ्या प्रजेला जें सुख मिळत आहे, तें ईश्वरी कृपेमुळें नसून माझ्या कर्तृत्वामुळें मिळत आहे. या नास्तिकपणाचें प्रायश्चित्त म्हणून प्रजेनें त्याला लगेच पदच्युत केला! याच्या उलट 'ईश्वरोऽहं अहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी' अशी असीरियांतील असुरांची मनोवृत्ति होती. असो, चायमानानें ज्या वरशिखांचा संहार केला, त्यांचा आतां शोध घेतला पाहिजे. काबूलच्या उत्तरेला हिंदुकुश पर्वत ओलांडल्यावर कुंदुझ नांवाची नदी लागते आणि हिंदुस्थानांतील चित्रळच्या उत्तरेला हिंदुकुश ओलांडल्यावर मीनजन नांवाची नदी लागते. या मीनजन नदीपासून कुंदुझ नदीकडे जातांना वाटेंत वरसख नांवाची एक लहानशी नदी आहे. या वरसख नदीच्या तीरावरील लोकांनाच ऋग्वेदकालीं वरशिख म्हणत असावेत. या वरशिखांचें स्थान निश्चित करण्याचें महत्त्व अशा दृष्टीनें आहे कीं त्यामुळें वरील अवतरणांतील यव्यावती आणि हरियूपीया या नद्यांचीं किंवा नगरींचीं स्थानेंहि हिंदुकुश पर्वताच्या पलीकडेच आहेत, असें अनुमान काढतां येतें. पंजाबांतील हराप्पा या गांवाजवळील उत्खनन चालू झाल्यापासून अनेक विद्वानांनीं ऋग्वेदांतील हरियूपीया नगरी हराप्पाच्या शेजारींच असली पाहिजे, असें प्रतिपादन केलें आहे. त्या सार्‍या विद्वत्तेचें वैयर्थ्य वरशिखांच्या शोधामुळें आपोआपच प्रत्ययाला येतें. काश्मीर प्रांतांतील यासीन या उपप्रांतांत वर्शिकवार नांवाची एक बोली प्रचलीत आहे. तिचा वरशिखांशीं संबंध असूं शकेल.

चायमानानें केलेला वरशिखांचा संहार, दैववातानें केलेला वृचीवंतांचा पराजय आणि सृंजयानें केलेला तुर्वशाचा पाडाव या सार्‍या

बहुधा एकाच युद्धांतील घटना असाव्यात. त्यामुळेंच चायमानाच्या पदरीं असलेल्या बार्हस्पत्य भरद्वाजानें त्यांचा एकत्र उल्लेख केला असावा. यांपैकीं वृचीवंत आणि तुर्वश यांच्याशीं झालेल्या लढायांचा परस्परांशीं संबंध सिद्ध करणें अगदीं सोपें आहे. ' Urgeschichte der Arier in Vorder und Central Asien 'या अतिमहत्त्वाच्या ग्रंथाचे कर्ते डॉ. हेर्मान ब्रुन्होफर यांनीं वृचीवंत या नांवाची चर्चा करून असें दाखवून दिलें आहे कीं यदुकुलांतील क्रोष्टुचा पुत्र वृजिन्वत् याच्या नांवावरून तें नांव उद्भवलें आहे. मेवाडच्या प्रतापसिंहाचा भाऊ सूक्त याच्या नांवावरून सूक्तावत, किंवा त्याच कुळांतील चोंडा या राजपुत्राच्या नांवावरून चोंडावत हीं कुळें कशीं उद्भवलीं हें ज्यांना माहीत आहे, त्यांना डॉ. ब्रुन्होफेर यांची कल्पना लगेच पटेल. प्राचीन काळाच्या वंशावळींतील नांवें पुष्कळदा व्यक्तींचीं नांवें नसून तीं कुळांचीं, वंशांचीं किंवा टोळ्यांचीं नांवें असतात, ही गोष्ट लक्ष्यांत घेतली तरच त्या वंशावळींचा प्राचीन इतिहासाच्या चिकित्सेंत उपयोग होऊं शकतो. वृचीवंत लोक यदुकुलांतील होते हें समजलें म्हणजे ते तुर्वशांशीं संगनमत करूनच लढत होते, हें वेगळें सांगावें लागत नाहीं. 'छाया तनूची तनुला न सोडी । या बंधुची एक अभिन्न जोडी ' हें मोरोपंतांचें वर्णन यदु आणि तुर्वश या कुळांना पुष्कळशा प्रमाणांत लागू पडतें. ऋग्वेदांत बहुतेक ठिकाणीं यदुतुर्वशांचे उल्लेख एकत्रच येतात. या उभयतांनीं वरशिखांप्रमाणेंच चायमानाच्या इतर शत्रूंनाहि सहाय्य केल्याचे उल्लेख ऋग्वेदांत आढळतात. तेव्हां बार्हस्पत्य भरद्वाजाच्या या सूक्तांत उल्लेखिलेल्या युद्धांत एकीकडे वरशिख, वृचीवंत आणि तुर्वश, आणि दुसरीकडे चायमान, सृंजय आणि दैववात हे परस्परांविरुद्ध लढत होते, असें साधार म्हणतां येतें. या युद्धांत वरशिखांचा तर पुरताच संहार झाला; पण तुर्वश आणि वृचीवंत यांनीं बहुधा चायमानाला शरण जाऊन आपापलीं कुळें वांचविण्याचा प्रयत्न केला असावा. कारण पुढें

भारतवर्षावर जेव्हां चायमानानें स्वारी केली तेव्हां तुर्वशांची सेना त्याच्यावरोबर होतीच. यदूंचीहि बहुधा असावी, असें वाटतें. पण त्या प्रश्नाची चर्चा पुढें योग्य स्थळीं करतां येईल.

यदुतुर्वशांनीं चायमानाच्या अन्य शत्रूंना सहाय केल्याचें एक उदाहरण येथें देणें आवश्यक आहे. 'पुरःसद्यः इत्थाधिये दिवोदासाय शंबरम्। अध त्यं तुर्वशं यदुम्' ( ९–६१–२ ) या ऋचेंत दिवोदासानें शंबराच्या बरोबरच यदुतुर्वशांना जिंकल्याचा उल्लेख आला आहे. त्यावरून यदुतुर्वश हे शंबराला सहाय करीत होते एवढें अनुमान काढतां येतें. 'यः शंबरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविंदत्।' ( २–१२–११ ) म्हणजे पर्वतांत आसरा घेणाऱ्या शंबराला चाळीसाव्या शरदृतूंत इंद्रानें मारलें. या ऋचेच्या आधारानें असें म्हणतां येतें कीं शंबराशीं चाललेलें युद्ध चाळीस वर्षें टिकलें होतें. इतकीं वर्षें युद्ध चालवावयाला शंबराला कोणाचें तरी सहाय मिळविणें आवश्यकच होतें. आणि तें त्यानें यदुतुर्वशांच्या कडून मिळविलें होतें. आतां शंबर हा चायमानाचाच खरा शत्रु होता, असें मानण्याला आधार काय आहेत तें सांगितलें पाहिजे.

त्वं शतान्यव शंबरस्य पुरो जघन्थाप्रतीनि दस्योः।
अशिक्षो यत्र शच्या शचीवो दिवोदासाय सुन्वते सुतक्रे
भरद्वाजाय गृणते वसूनि ॥ ( ६ ३१-४ )

या ऋचेवरून असें कळतें कीं दिवोदासानें शंबराचीं शंभर पुरें जिंकलीं तेव्हां भरद्वाजाला धनलाभ झाला. भरद्वाज हा चायमानाचा आश्रित होता, हें वर आलेंच आहे. तेव्हां शंबराला लुटून मिळविलेल्या धनाचा कांहीं भाग दिवोदासानें भरद्वाजाला दिला असला तर तो केवळ आपल्या सम्राटाच्या एका आश्रित भिक्षुकाच्या यजनाचा स्वतःला उपयोग व्हावा, याकरितां दिला होता, हें उघड आहे. या कृत्यावरूनच

दुसरें अनुमान असें निघतें कीं प्रस्तुत प्रसंगीं दिवोदास स्वतःच्या शत्रूंशीं लढत नसून सम्राट चायमानाच्या शत्रूंशीं लढत होता. दिवोदासाचें राज्य भारतवर्षांत होतें, हें त्याचा पुत्र सुदास याची चायमानाशीं परुष्णीच्या तीरावर लढाई झाली, यावरून उघडच आहे. याच्या उलट शंबरांचें मूलस्थान इराणच्या उत्तरेला होतें, असें अनुमान करण्याला अनेक कारणें आहेत. 'त्वं कुत्सं शुष्णहत्येषु आविथ अरंधयोऽतिथिग्वाय शंबरम्। महान्तं चिदर्बुदं नि क्रमीः पदा सनादेव दस्युहत्याय जज्ञिषे। (१–५१–६) म्हणजे शुष्णाला मारण्याच्या प्रसंगीं तूं कुत्साचें रक्षण केलेंस, अतिथिग्वाकरितां शंबराला चिरडून टाकलेंस आणि महान् असा अर्बुद पर्वतहि तूं ओलांडलास, याप्रमाणें दस्युहत्येच्या प्रसंगीं तुझें सहाय्य झालें. या ऋचेंत उल्लेखिलेलीं सारीं स्थळें इराणच्या उत्तरेचींच आहेत. शुष्ण लोक आझरबैजन प्रांताच्या दक्षिण भागांत रहात असत. इराणच्या उत्तरेकडील सुंबरनदीतीरस्थ लुटारू टोळ्यांना प्राचीनकाळीं शंबर ही संज्ञा होती. अर्बुद हा इराणच्या उत्तरेचा महान् असा अल्बुर्झ पर्वत होय. तेव्हां या भागांतील लोकांशीं भारतीय दिवोदासाचें वैर असण्याचें कांहींच कारण नव्हतें. केवळ चायमानाचा अंकित म्हणून त्याला या भागांत लढावें लागलें. पुढें हखामणी कुळांतील इराणी राजांनीं भारतीय सेना ग्रीसमध्येंहि नेल्या; तेव्हां चायमानानें शंबरांना जिंकण्याकरितां त्यांचा उपयोग केला असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं.

शंबरांना जिंकण्याच्या प्रसंगीं अतिथिग्वदिवोदासांना किती प्रचंड सैन्याशीं लढावें लागलें, याची माहिती ऋग्वेदांत चारदोन ठिकाणीं आली आहे. 'अध्वर्यवो यः शतं शंबरस्य पुरो बिभेद अश्मनेव पूर्वीः। यो वर्चिनः शतमिंद्रः सहस्रं अवापतद् भरता सोममस्मै।'(२–१४–६) म्हणजे अध्वर्यूंनो, ज्यानें शंबराचे शंभर किल्ले फोडले आणि वर्चीचे एक लाख सैनिक रणांगणावर निजविले, त्या इंद्राला सोम अर्पण करा.

चौथ्या मंडलांतील तिसाव्या सूक्तांत वामदेवानें 'उत दासस्य वर्चिनः सहस्राणि शता अवधीः। अधि पंच प्रधीन् इव।' म्हणजे वर्चीच्या पांच लक्ष सैन्याचा चक्काचूर झाल्याचा उल्लेख केला आहे. शंबराला यदुतुर्वशांनीं सहाय केल्याची माहिती वर आलीच आहे. तेव्हां या स्थलीं वर्ची नांवानें त्यांचाच निर्देश केला असला पाहिजे, हें उघड आहे. याचा अर्थ असा होतो कीं वर्ची हें वृचीवंतांचेंच अपर नाम होतें आणि तुर्वशवृचीवंतांशीं झालेल्या लढाया शंबरांवरील स्वारीपासूनच उद्भवल्या होत्या.

असल्या संशोधनात्मक लेखनांत लिहितां लिहितां पुष्कळदा अनपेक्षित कल्पना सुचतात. असाच प्रकार वर उल्लेखिलेलें दुसऱ्या मंडलांतील चौदावें सूक्त चाळतांना आतां घडला आहे. वर्चीच्या माहिती-करितां तें सूक्त चाळतांना असें आढळून आलें आहे कीं अतिथिग्वाचे शत्रु स्वतःला भरत म्हणवून घेत असत. 'अध्वर्यवो यः शतमा सहस्रं भूम्या उपस्थे ऽवपज्जघन्वान्। कुत्सस्य आयोरतिथिग्वस्य वीरान् न्यवृणक् भरता सोममस्मै।' 'ज्यानें कुत्स, आयु आणि अतिथिग्व यांच्या लक्ष वीरांना ठार मारलें, त्या इंद्राला हे भरतांनो, सोम अर्पण करा.' अतिथिग्वाचा हा पराभव चायमानाच्या हस्तकांनींच केला होता, हें पुढें यावयाचेंच आहे. पण त्यामुळें येथें अशी शंका येते कीं पार्थव चायमान स्वतःला भरतकुळांपैकींच समजत असे कीं काय? तसें असल्यास अतिथिग्वदिवोदासासारख्या भरतकुलोत्पन्नांनीं त्याला त्याच्या संकटाच्या काळीं सहाय करणें स्वाभाविकच आहे. नाहींतर येथें दुसरी शंका अशी येते कीं प्रस्तुत सूक्ताचा कर्ता गृत्समद हा त्याच्या नांवावरूनच इगणांतील मदकुलोत्पन्न दिसतो, तेव्हां मदांमध्यें भरत हें उपकुल होतें कीं काय? हा प्रश्न पुढें केव्हां तरी सोडवावा लागेल. आतां तो अनिर्णीतच ठेवणें भाग आहे. भरत शब्दाचा एक अर्थ

पर्वतवासी असा आहे. त्या अर्थानें कदाचित् पांचाल आणि पार्थव हे दोघेहि भरत असतील.

अतिथिग्वाप्रमाणेंच त्याचा पुत्र जो दिवोदास, त्याचाहि चायमानाच्या हस्तकांनीं पराजय केल्याचा उल्लेख ऋग्वेदांत आढळतो. बार्हस्पत्य भरद्वाजानें सहाव्या मंडलांतील सरस्वतीसूक्ताच्या प्रारंभींच 'इयमददाद्रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे' असा आनंदोद्गार काढला आहे. या उद्गाराचा वास्तविक अर्थ ऋणच्युत म्हणजे कृतघ्न अथवा करभार नाकारणाऱ्या दिवोदासाला वध्र्यश्वानें युद्धांत धरलें. हें वचन सरस्वतीसूक्तांत आलें असल्यानें त्यांत उल्लेखिलेली घटना त्या नदीच्या तीरावर घडून आली असावी, असें अनुमान करणें न्याय्यच आहे. या वचनाचें, सरस्वतीनें वध्र्यश्वाला दिवोदास नांवाचा पुत्र दिला हें अनेकांनीं केलेलें भाषांतर, त्यांत ऋणच्युत शब्दाचा अर्थ बदलावा लागत असल्यानें अगदीं अग्राह्य आहे. ज्यांच्या नामांच्या अंतीं अश्व, अज, उष्ट्र, उक्षन् इत्यादि पशु येतात, त्या व्यक्ति भारतीय असल्याचें नक्की माहीत नसलें, तर त्यांना इराणी समजणें समर्थनीय आहे. त्यांतून बृसयांचा म्हणजे सध्यां बलुचिस्थानांत असणाऱ्या पण प्राचीनकाळीं इराणांतहि भटकणाऱ्या ब्राहुई (बिराहि) लोकांचा नायनाट करण्याची प्रार्थनाहि त्याच सूक्तांत भरद्वाजानें सरस्वतीला केली असल्यानें त्याचे इराणशीं असणारे लागेबांधे स्पष्ट समजून येतात. या बृसयांचा कांटाहि वध्र्यश्वानें काढला असावा, असें अनुमान करण्याला दहाव्या मंडलांतील वाध्र्यश्व सुमित्राच्या सूक्तांतून आधार आहे. त्यांतच त्यानें 'शूर इव धृष्णुश्च्यवनः प्र नु वोचं वाध्र्यश्वस्य नाम' (१०.६९-५) असा जो स्वतःचा उल्लेख केला आहे, त्यावरून तो च्यवनांच्या कुलांतील होता, हें उघड आहे. च्यवनांनीं मदाच्या सहायानें इंद्रालाहि शरण यावयाला लावल्याची कथा आरण्यकपर्वांत आली आहे. त्या कथेवरून च्यवनांचा मदांशीं म्हणजे मीडिया देशाशीं असलेला संबंध कदाचित्

अधिकारी संस्कृतज्ञांनासुद्धा कळूं शकेल. आपल्या इकडे अश्विनीकुमारांनीं पुनर्यौवन मिळवून दिलेला च्यवनच प्रसिद्ध असल्यानें च्यवनांच्या पराक्रमांकडे विद्वानांचेंहि लक्ष्य जात नाहीं. च्यवनांचा भार्गवांशीं किंवा कविकुळाशीं निकटचा संबंध होता. तेव्हां ऋग्वेदांतील प्रमुख सरस्वतीच्या म्हणजे इराणी सरस्वतीच्या तीरावर दिवोदासाला अटक करणारा वध्र्यश्व हा सृंजयसोमकपांचालकुलांशीं संबंध असलेल्या त्या भारतीय राजाचा पिता होता, ही कल्पना सर्वस्वीं निराधार आहे, असें निःशंकपणें म्हणतां येतें. असल्या चुकीच्या कल्पना मनांत भरल्यामुळें अधिकारी विद्वानांच्या हातून कसले चमत्कार घडत आहेत, याचा नमुना म्हणून भांडारकर प्राच्यसंशोधनसंस्थेच्या रौप्य महोत्सवाच्या अंकांतील 'दिवोदास अतिथिग्व आणि इतर दिवोदास' हा प्रो. वेलणकरांचा अद्भुत लेख वाचकांनीं चाळून पहावा.

अतिथिग्वदिवोदासांनीं चायमानाशीं वैर करण्याचें धाडस केव्हां केलें असावें, याची थोडीशी कल्पना पहिल्या मंडलांतील ५३ व्या सूक्तावरून येते.

त्वमेताञ्जनराज्ञो द्विर्दशाबन्धुना सुश्रवसोपजग्मुषः ।
षष्टिं सहस्रा नवतिं नव श्रुतो नि चक्रेण रथ्या दुष्पदावृणक् ॥९॥
त्वमाविथ सुश्रवसं तवोतिभिस्तव त्रामभिरिंद्र तूर्वयाणम् ।
त्वमस्मै कुत्समतिथिग्वमायुं महे राज्ञे यूने अरंधनायः ॥ १० ॥

म्हणजे सुश्रवसाचा बंधु अन्यत्र गुंतला आहे असें पाहून लहान मोठ्या वीस टोळयांच्या राजांनीं त्याच्यावर हल्ला केला असतां त्यांच्याच साठ सहस्राहून अधिक सैन्याचा विध्वंस होऊन त्यांच्यापैकीं कुत्स, अतिथिग्व आणि आयु हे तूर्वयाणाच्या पराक्रमामुळें युद्धबंदी झाले आणि युवराज सुश्रवसाचा लौकिक झाला. या अवतरणांतील सुश्रवस् हें नांव कवि हुस्रव या स्वरूपांत अवेस्त्यांत आढळतें. अर्वाचीन फारशींत हुस्रवचें

खुस्रू असें रूपांतर झालें आहे. प्राचीन चरित्रकोशावरून पाहतां सुश्रवस् या नांवाचा दुसरा एकहि राजा हिंदुस्थानांत झालेला आढळत नाहीं. तेव्हां वरील ऋचांतील सुश्रवस् इराणी होता, असें म्हणण्याला प्रत्यवाय दिसत नाहीं. आतां सुश्रवसाला लावलेल्या अबंधुना या विशेषणाचा थोडा विचार केला पाहिजे. या विशेषणावरून त्याप्रसंगीं त्याला इतर कोणाहि राजबंधूंचें ( brother kings ) सहाय नव्हतें, असा सहज सुचणारा अर्थ भाषांतरकारांनीं घेतला आहे. पण अतिथिग्वाच्या काळीं इराणांत चायमानाचें साम्राज्य होतें, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे तो अर्थ अग्राह्य मानावा लागतो. कारण सम्राटाला त्याच्या बरोबरीचे राजबंधु कोठून लाभणार ? याकरितां अबंधुना याचा अर्थ त्याचा बंधु अन्यत्र गुंतलेला असतांना असाच करावा लागतो. ' राज्ञे यूने ' या शब्दांनीं वरील अर्थाला पुष्टिच मिळते. कारण त्या शब्दांचा अर्थ या ठिकाणीं तरुण राजा असा नसून युवराज असा आहे. पुरातनकाळीं बंधूंना यौवराज्य देण्याची पद्धति होती, हें भारताच्या वाचकांना तरी विदित असेल. सुश्रवसाच्या शोधानंतर तूर्वयाणाचाहि थोडा शोध केला पाहिजे. दिवोदासाला जिंकणाऱ्या वध्र्यश्वाप्रमाणें अतिथिग्वाला जिंकणारा तूर्वयाणहि च्यवन कुळांतीलच होता.

सद्द्मानाय दभ्याय वन्वन् च्यवानः सूदैरमिमीत वेदिम् ।
तूर्वयाणो गूर्तवचस्तमः क्षोदो न रेत इत ऊति सिंचत् ॥१०-६१-२

या ऋचेंतील च्यवान शब्दाचा संबंध तूर्वयाणाकडेच लागतो. हा तूर्वयाण चायमानाच्या परुष्णी नदीतीरावरील पराजयानंतर मारला गेला, असें पहिल्या मंडलांतील १७४ व्या सूक्तावरून ( अशुषं तूर्वयाणम् ) समजतें. या प्रश्नाची सविस्तर चर्चा आतांच करण्याचा विचार नव्हता. पण ती न केल्यामुळें पुढील प्रगति प्रतिहत होऊं लागल्यानें तो विचार बदलावा लागला. परुष्णी नदीतीरावरील लढाईनंतरच्या कांहीं घटनांचा

उल्लेख पहिल्या मंडलांतील १७४ व्या सूक्तांत आढळतो, ही वस्तुस्थिति अधिकारी विद्वानांना अद्यापि माहीत नाहीं. तेव्हां ती गोष्ट येथें प्रथम सिद्ध केली पाहिजे आणि मग त्या सूक्तांतील माहिती आधाराला घेतली पाहिजे. परुष्णी नदी सुदासादींनीं ओलांडल्यानंतर त्यांनीं शत्रूचीं सात पुरें ( इंद्रः पुरः सहसा सप्त दर्दः ७-१८-१३ ) जिंकलीं, असें वसिष्ठानें सांगितलें आहे. त्याच सातपुरांचा विध्वंस केल्याचा उल्लेख ( दृनो विश इंद्र मृध्रवाचः सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दर्त् । १-१७४-२) अगस्त्यानेंहि केला आहे. याप्रसंगीं पुरुकुत्सानें वृत्र लोकांना जिंकलें. ( यूने वृत्रं पुरुकुत्साय रंधीः ) याच्या पुढच्यांच ऋचेंत 'अशुषं तूर्वयाणं' असा उल्लेख असल्यानें चायमानाच्या सैन्यांत तेव्हां तूर्वयाण होता आणि कुत्साचा पुत्र जो पुरुकुत्स त्याच्या सैन्याशीं लढतांना तो मारला गेला, असें स्वाभाविक अनुमान काढावें लागतें. दुसऱ्या मंडलांत 'अशुषं कुयवं कुत्साय' ( २-१९-६ ) म्हणजे कुत्साकरितां कुयवाला मारलें, असा प्रयोग असल्यानें 'अशुषं तर्वयाणं' या पदांचा मी केलेला अर्थ यथार्थ आहे, असें, असें मला वाटतें. याप्रमाणें चायमान आणि तूर्वयाण या उभयतांचा परस्परसंबंध सिद्ध झाला म्हणजे तूर्वयाणानें कुत्स, अतिथिग्व आणि आयु यांना कोणाकरितां जिंकलें होतें, हें उघडच होतें. तूर्वयाणाचा आणि चायमानाचा कांहींच संबंध नाहीं, अशा कल्पनेनें प्रो. वेलणकरांनीं आपला लेख लिहिला असल्यानें त्यांना तूर्वयाणाच्या लढाया आणि दाशराज्ञयुद्ध यांचा परस्परसंबंध मुळींच समजला नाहीं.

या ठिकाणीं प्रो. वेलणकरांनीं प्रसृत केलेल्या पाखंडाचें पूर्ण खंडन करणें आवश्यक आहे. वर उल्लेखिलेल्या त्यांच्या 'दिवोदास अतिथिग्व आणि इतर अतिथिग्व' या प्रबंधांत त्यांनीं असें प्रतिपादिलें आहे कीं शंबराचा पाडाव करणारा अतिथिग्व आणि तूर्वयाणाकडून पराभव

पावणारा अतिथिग्व हे परस्परांपासून अगदीं भिन्न असले पाहिजेत. कारण काय तर पहिल्या मंडलांतील ५३ व्या सूक्तांत अतिथिग्वाचा जय आणि पराजय यांचे उल्लेख जवळजवळ लागोपाठ आले आहेत ! असल्या अपूर्व पुराव्यांच्या पुढें नव्हे, तर ते देणाऱ्यांच्या पुढें हात जोडावेसे वाटतात. शंबराला जिंकणाऱ्या अतिथिग्वाचाच तूर्वयाणानें पराजय केला असला पाहिजे, हें सिद्ध करण्याला याहून सबळ पुरावा देणें शक्य आहे. उदाहरणार्थ, अतिथिग्वदिवोदासांनीं शंबराचा पराजय केला ही गोष्ट सुप्रसिद्ध असल्यानें सामान्यतः त्या दस्यूच्या पराजयाचा जिथें उल्लेख येतो, तिथें त्या पितापुत्रांपैकीं एखाद्याचा उल्लेख येणें स्वाभाविक दिसतें. विशेषतः दिवोदासाचा आणि बार्हस्पत्य भरद्वाजाचा अतिशय चांगला ऋणानुबंध असल्यानें त्याच्या सूक्तांतून तरी त्यांना अनुल्लेखानें मारण्याचे प्रयत्न होऊं नयेत. ‘ त्वमिम्रा वार्या पुरु दिवोदासाय सुन्वते । भरद्वाजाय दाशुषे ’ अथवा ‘ आ अग्निरगामि भारत. वृत्रहा पुरुचेतनः । दिवोदासस्य सत्पतिः ।’ असल्या ऋचा भरद्वाजमंडलाच्या १६ व्या सूक्तांत लिहिणाऱ्या भरद्वाजानें १८ सूक्तांत शंबराच्या पराजयाचा उल्लेख करतांना अतिथिग्वदिवोदासांचा उल्लेख केला नसला तर तो अनुल्लेख करण्याला कांहीं तरी राजकीय कारण घडलें होतें, हें उघड आहे. त्या कारणाचा त्या सूक्तांत उल्लेखहि आहे. ‘ प्र तत् ते अद्याकरणं कृतं भूत् कुत्सं यदायुं अतिथिग्वमस्मै । पुरू सहस्रा नि शिशा अभि क्षाम् उत्तूर्वयाण धृषता निनेथ ॥१३॥ या ऋचेंत बार्हस्पत्य भरद्वाज तूर्वयाणाकडून कुत्स अतिथिग्व आणि आयु हे धरले गेल्याबद्दल इंद्राची साश्चर्य स्तुति करीत आहे. ही स्तुति केवळ निरपेक्ष भक्तिभावानें चालली आहे, असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. अतिथिग्वदिवोदासांचा हा परममित्र जर त्या मित्रांच्या अटकेनें आनंदित होऊन कधीं इंद्राची, कधीं सरस्वतीची स्तुति करतांना आढळला तर त्याचें कारण एकच असूं शकतें तें हेंच कीं त्या वेळीं

अतिथिग्वदिवोदासांनीं भरद्वाजाच्या यजमान सम्राट् चायमान याच्या विरुद्ध बंड उभारलें होतें.

वरील दोघे अतिथिग्व विभिन्न ठरवूनहि प्रो. वेलणकरांचें समाधान झालें नाहीं. त्यांनीं असाहि आग्रह धरला आहे कीं करंजपर्णयांनाहि अतिथिग्वानें जिंकल्याचा उल्लेख आढळतो तर तो एक तिसरा स्वतंत्रच अतिथिग्व मानला पाहिजे. वास्तविक पाहतां अशा प्रकारचा पूर्वग्रह बनविण्याचें कांहींच कारण नाहीं. पर्णय हें पार्थव लोकांतील एका प्रमुख टोळीचें नांव होतें. इराणच्या इतिहासावरून असें समजतें कीं पुरातन काळीं पर्णी लोक बाल्हीक प्रांतांत रहात असत. या बाल्हीक देशाच्या राजांशीं अतिथिग्वाच्या वंशजांचीं अनेकदा भांडणें झाल्याचे उल्लेख श्रुतिवाङ्मयांत आढळतात. अतिथिग्वानें ज्या गुंगूंच्या सहायाकरितां करंजपर्णयांना जिंकलें, ते गुंगू लोक बाल्हीकांचे शेजारीच होते. तेव्हां पर्णयांचा संहार करून गुंगूंना वांचविणें हें पार्थव सम्राट् कविचायमान याच्याविरुद्ध बंड करणाऱ्या अतिथिग्वाच्या चरित्राशीं अत्यंत सुसंगत आहे. यासंबंधीं प्रो. वेलणकरांना एकच गोष्ट सांगितली पाहिजे. ती ही कीं त्यांना वाटतो तसा ऋग्वेदांत अतिथिग्वांचा सुळसुळाट झाला असता तर त्यांच्या भिन्नतेच्या कांहीं आख्यायिका तरी बृहद्देवतादि ग्रंथांतून उपलब्ध झाल्या असत्या. भरद्वाज हा चायमानाचा गुरु होता, अशी खरी किंवा खोटी आख्यायिका वेदार्थदीपिकेंत आढळते. तशी अतिथिग्वाविषयींहि एखादी आख्यायिका आपल्या परंपरेंत राहिली असती. पण प्रो. वेलणकरांच्या समजुतीप्रमाणें वस्तुस्थिति नसल्यानें अशा आख्यायिका प्रचलित होण्याचें कांहीं कारणच नव्हतें.

सृंजय, देववात, अभ्यावर्ती चायमान हीं सारीं एकाच व्यक्तीचीं नांवें ठरविण्याच्या एका प्रयत्नाचा यापूर्वीं उल्लेख आलाच आहे. त्याच्याच तोडीचा प्रयत्न करून प्रो. वेलणकरांनीं तुर्वयाणाकडून पराभूत झालेल्या

कुत्स, अतिथिग्व आणि आयु या त्रैमूर्तींचा एकच दत्तात्रेय बनविण्याचा प्रयत्न केला आहे. किंवा हा सुद्धा एका कुत्साचे अनेक कुत्स बनविण्याचाच प्रयत्न आहे, असें म्हटलें तरी चालेल. ' राधेय अन्य तूं, तो अन्यचि जाणो पळोनि जो गेला ' असले उद्गार वाङ्मयांत कितीहि शोभून दिसले तरी इतिहासांत ते अगदीं अस्थानीं आहेत, हें प्रो. वेलणकरांनीं विसरूं नये. शुष्णांवर विजय मिळविणारा कुत्स एक आणि तूर्वयाणाकडून पराजय पावणारा दुसरा असें मानण्याला ऋग्वेदांत कोणताहि आधार नाहीं. एखाद्या महत्त्वाच्या लढाईत तीन प्रमुख वीर शत्रूंच्या हातीं लागले तर त्या लढाईला अनुलक्षून लिहिणाऱ्या प्रत्येक कवीच्या सूक्तांतून त्या तिघांचाहि उल्लेख येणें स्वाभाविक आहे. तेव्हां कुत्स, अतिथिग्व आणि आयु असे तिघांचे मिळून एकत्र उल्लेख येतात, एवढ्याच कारणाकरितां त्यांना एक व्यक्ति मानणें अगदीं असमर्थनीय आहे. यांपैकीं प्रत्येकाचे स्वतंत्र उल्लेख ऋग्वेदांतून अनेकदा आले आहेत. वेदाभ्यासाची किंवा वेदचिकित्सेची सामान्य: लोकांत टवाळी होऊं नये, एवढ्याकरितां तरी प्रो. वेलणकरांसारख्या विद्वानांनीं अधिक विचारपूर्वक लेखन करणें आवश्यक आहे.

कुत्स, अतिथिग्व आणि आयु इतकीं नांवें एका व्यक्तीचींच आहेत, असें प्रतिपादून प्रो. वेलणकरांचें समाधान न होऊन त्यांनीं दिवोदास आणि अतिथिग्व हाहि एकाच व्यक्तीचीं नांवें ठरविलीं आहेत. मात्र या ठिकाणीं पूर्वसूरींचें अंध अनुकरण करण्यापलीकडे त्यांच्याकडे दोष येत नाहीं. वास्तविक पाहतां गर्गानें सहाव्या मंडलाच्या ४७ व्या सूक्तांत ' दिवोदासादतिथिग्वस्य राधः शांबरं वसु प्रत्यग्रभीष्म ' म्हणजे अतिथिग्वानें मिळविलेल्या शंबरांच्या लुटींतील भाग दिवोदासाच्या द्वारां आपल्याला मिळाल्याचा उल्लेख केलेला पाहून तरी दिवोदास आणि अतिथिग्व या भिन्न व्यक्ति असल्याचा साक्षात्कार वेदाच्या नव्या चिकित्सक अभ्यासकांना व्हायला पाहिजे होता. दिवोदास आणि अतिथिग्व

यांना भिन्न भिन्न ठिकाणीं आणि भिन्न भिन्न शत्रूंनीं धरल्याच्या वर्णनांवरून तर त्यांचें पृथक् अस्तित्व मान्य करण्यावांचून गत्यंतरच उरत नाहीं.

शंबराला जिंकण्यासंबंधीं दिवोदास आणि अतिथिग्व यांचे उल्लेख जितक्या ठिकाणीं आले आहेत, तितक्या सर्वांची चिकित्सा करून प्रो. वेलणकरांनीं ते दोघेहि एकच होते, असें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. या प्रयत्नासंबंधीं मला त्यांना असें सांगावयाचें आहे कीं, बहुतेक सर्व ठिकाणीं सूक्तकारांनीं शंबरांच्या अंतिम पराजयाच्या प्रसंगीं (अरंधयोऽतिथिग्वाय शंबरम्) अतिथिग्वाचा उल्लेख केला आहे आणि शंबराचीं ९९ पुरें जिंकण्याच्या प्रसंगीं दिवोदासाचाच मुख्यतः उल्लेख केला आहे. हा भेद प्रो. वेलणकरांनीं लक्षांत घेतलेला नाहीं. त्यामुळें त्या पितापुत्रांना एकच समजण्याचा घोटाळा ते आणि त्यांच्याचसारखे इतर अधिकारी विद्वान् करीत आहेत.

वास्तविक पाहतां प्रो. वेलणकरांच्या त्या दुर्दैवी लेखाची चिकित्सा करण्याची फारशी आवश्यकता नव्हती. पण प्रस्तुत प्रबंधांतील मूलभूत सिद्धांतांच्या मुळाशींच कुऱ्हाड घालणारा तो लेख असल्यानें त्याची चिकित्सा करण्याचा कांहीं मित्रांनीं आग्रह केला, म्हणून त्यासंबंधीं चार ओळी लिहाव्या लागल्या. आतां तो विषय संपवून अतिथिग्वानीं सुश्रवसावर स्वारी केली, तेव्हां चायमान कोणत्या महत्कार्यांत गुंतला होता, याचा विचार केला पाहिजे. चायमानाच्या साम्राज्यासारख्या विस्तीर्ण साम्राज्याचें दुसऱ्या एखाद्या विस्तीर्ण आणि बलिष्ठ साम्राज्याशीं युद्ध जुंपलें असेल, तेव्हांच त्याचे अंकित त्याच्याविरुद्ध बंड करण्याचें साहस करूं शकतात. या दृष्टीनें विचार केला असतां चायमानाच्या इराणी साम्राज्याशीं टक्कर देण्याजोगें एकच साम्राज्य पुरातनकाळीं अस्तित्वांत असल्याचें आढळून येतें. तें म्हणजे इराणच्या पश्चिम सीमेवरील असीरिया किंवा बॅबिलोनिया यांचें साम्राज्य होय. खि-

पू. २४५८ च्या सुमाराला इराणी लोकांनीं या साम्राज्यावर स्वारी करून बाबिलोन नगरी जिंकली आणि तिथें सुमारें २२५ वर्षे राज्य केलें, असें बाबिलोनचे इतिहासकार सांगतात. ही घटना चायमानाच्या काळीं घडली असावी, असें दाशराज्ञयुद्धकालीन परिस्थितीचा सूक्ष्म विचार केला असतां मला वाटतें. ब्रुन्होफेरनें तर पांचव्या मंडलांतील एकोणिसाव्या सूक्तांत आत्रेय वव्रि या ऋषीनें बाबिलोनच्या पाडावाचें वर्णन केलें आहे, असें मत प्रतिपादिलें आहे. या प्रतिपादनांत पुष्कळच अर्थ असावा, असें सायणाचार्यांच्या भाष्यावरून वाटतें.

अभ्यवस्थाः प्र जायन्ते प्र वव्रेर्वव्रिश्चिकेत । उपस्थे मातुर्वि चष्टे ॥१॥
जुहुरे वि चितयन्तोऽनिमिषं नृम्णं पान्ति । आ दृळहां पुरं विविशुः ॥२॥

या महत्त्वाच्या ऋचांवरील आचार्यांचें भाष्य पुढीलप्रमाणें आहे.

वव्रेः ऋषेः अभि उत्तरोत्तरम् अवस्थाः अशोभना दशाः प्रजायन्ते । तादृशीः वव्रिः हविषां संभक्ता सोऽग्निः प्र चिकेत प्रजानीयात् । ज्ञात्वा चापनयतु इति भावः । यो ऽग्निः मातुः पृथिव्याः उपस्थे समीपे स्थितं पदार्थजातं वि चष्टे पश्यति । ये वि चितयन्तः तव प्रभावं जानन्तो जनाः अनिमिषं सर्वदा जुहुरे जुहुविरे यज्ञार्थं त्वामाह्वयन्ति, आहूय च नृम्णं तव बलं हविर्भिः स्तोत्रैः च पान्ति रक्षन्ति ते दृळहां शत्रुभिः साधयितुमशक्यां पुरम् पुरीम् आविविशुः प्रविशन्ति । शतं पूर्भिरायसीभिर्नि पाहि ( ऋ. ७-३-७ ) इति निगमः ।

या ऋचांवरील आचार्यांचें भाष्य सुस्पष्टच आहे. एका अजिंक्य नगरीला आग लावून तिच्यांत यजनशील आर्यांनीं प्रवेश केल्याचें वर्णन या ऋचांतून आलें आहे, इतका बोध या भाष्यावरून बालांनासुद्धा होऊं शकेल. या भाष्यांतील केवळ एकाच शब्दाच्या अर्थावर मला आक्षेप घ्यावयाचा आहे. तो म्हणजे पहिला वव्रि होय. या शब्दाचा अर्थ आचार्यांनीं परंपरेप्रमाणें वव्रि नांवाचा ऋषि असा केला आहे. पण तो

तसा न करतां येथें प्राचीन आर्यांना वव्रि या नांवानें परिचित असलेली बाबिलोन नगरी असा केला पाहिजे. नाहीं तर ऋषि वव्रीची अवस्था उत्तरोत्तर अवघड होत चालली आहे असें म्हणून पुढें वेढून जाळलेल्या नगरींत यजनशील लोकांचा प्रवेश झाल्याबद्दल आनंद व्यक्त करण्यांत कांहींच स्वारस्य नाहीं. बाबिलोन नगरीला अवेस्ता ग्रंथांत बवरी या नांवानें संबोधिलें आहे. हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे वव्रि शब्दानें येथें बाबिलोनचाच बोध होतो, हें ब्रुन्होफेरचें म्हणणें मनाला पटतें.

इराणी लोकांनीं बाबिलोन जिंकल्याचा उल्लेख ऋग्वेदांत सांपडतो हें अनुमान ब्रुन्होफेरनें प्रसिद्ध केल्याला आज पन्नासाहून अधिक वर्षें झालीं. पण इतक्या वर्षांत त्याच्या अनुमानाच्या सत्यासत्यतेची चिकित्सा इंग्लंड आणि हिंदुस्थान येथील एकाहि अधिकारी विद्वानानें केली नाहीं. अप्रिय ऐतिहासिक सत्य अनुल्लेखानें किंवा अधिक्षेपानें कसें मारावें, याचा हा एक उत्कृष्ट नमुना आहे. ब्रुन्होफेरचें अनुमान खरें मानल्यास ऋग्वेदांतील एका मंडलाचा काळ तरी ख्रि. पू. २५०० इतका प्राचीन ठरण्याची शक्यता दिसूं लागते, हें एकच कारण ब्रुन्होफेरच्या संशोधनाकडे इंग्रजांनीं आणि त्यांच्या दासांनीं दुर्लक्ष्य करण्याला पुरेसें होतें.

ब्रुन्होफेरच्या या प्रतिभासंपन्न संशोधनाला ऋग्वेदांत आणखीहि प्रत्यंतर पुरावा मिळण्याजोगा आहे. वसिष्ठाच्या सुप्रसिद्ध रक्षोघ्नसूक्तांत वव्रीचा पुढील उल्लेख आढळतो.

इंद्रासोमा तपतं रक्ष उब्जतं न्यर्पयतं वृषणा तमोवृधः ।
परा शृणीतम् अचितो न्योषतं हतं नुदेथां
नि शिशीतम् अत्रिणः ॥ १ ॥
इंद्रासोमा दुष्कृतो वव्रे अंतरनारंभणे तमसि प्रविध्यतम् ।
यथा न अतः पुनः एकः च न उदयत्
तत् वाम् अस्तु मन्युमत् शवः ॥ ३ ॥

या ऋचांपैकीं पहिल्या ऋचेची चिकित्सा मागाहून करतां येईल. ' इंद्रसोमांनो, वव्रीमधील असीम तमांत दुष्टांना असें विंधून टाका कीं त्यांच्यांतील एकजणसुद्धा पुनश्च वर येऊं नये. तुमच्या क्रोधयुक्त सामर्थ्याचा पुरता अनुभव येऊं द्या. ' असा उरलेल्या ऋचेचा अर्थ आहे. हा अर्थ अतिशय स्पष्ट आहे. येथें येऊन जाऊन वव्रे शब्दाचा अर्थ काय करावयाचा एवढाच प्रश्न आहे. सायणाचार्यांनीं त्याचा अर्थ वारके म्हणजे पीडास्थानीं असा केला आहे. अर्थात् त्यांच्या मतानें त्या शब्दाचा अर्थ नरक असा घेतला पाहिजे. पण नरकांतून कोणतेहि दुष्ट लोक पुनश्च वर येण्याचा संभवच नसल्यानें तसा अर्थ करण्यांत कांहीं स्वारस्य दिसत नाहीं. पुन्हा वव्रे याचा अर्थ नरकांत असा होत होता कीं नाहीं हें संशयितच आहे. याकरितां येथें आचार्यांचा अर्थ अग्राह्य मानावा लागतो. तो अर्थ टाकला म्हणजे मग वव्रे याचा अर्थ बाबिलोन नगरांत असाच घ्यावा लागतो. वव्रींतील असीम तमाचा या ऋचेंत आलेला उल्लेख वरील अर्थाला बाधक आहे, असें अनेकांना वाटेल पण ' असूर्या नाम ते लोका अंधेन तमसा वृताः ' हें ईशावास्योपनिषदांतील वर्णन असीरियासंबंधींची भारतीय आर्यांची भावना किंवा कल्पना दाखविते, ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे मग वव्रींतील असीम तमाचा उल्लेखहि भारतीय परंपरेशीं सुसंगतच आहे हें दिसून येईल. ऋग्वेदकालीन इतिहासाच्या चिकित्सेंत ईशावास्योपनिषदांतील वचनांचा आधार कित्येकांना फारसा समाधानकारक वाटणार नाहीं. याकरितां अत्रिमंडळांतील ३२ व्या सूक्तांतल्या एक दोन ऋचा येथें उतरून घेणें भाग आहे.

त्यं चित् इत्था कत्पयं शयान असूर्ये तमसि ववृधानम् ।
तं चित् मंदानः वृषभः सुतस्य उच्चैः इंद्रः अपगूर्य जघान ॥ ६ ॥
त्यं चित् अर्णं मधुपं शयानं असिन्वं वव्रं महि आदत् उग्रः ।
अपादं अत्र महता वधेन नि दुर्योणे आवृणक् मृध्रवाचम् ॥ ८ ॥

या ऋचांचा येथें संपूर्ण उलगडा करण्याची आवश्यकता नाहीं. ‘ असूर्ये तमसि ववृधानम् ’ अशा ‘वव्रा’ला इंद्रानें मारून टाकल्याचा उल्लेख येथें आला आहे, इतकें ज्ञान त्यावरून झालें तरी सध्या पुरें आहे. येथील वव्र शब्दाचा अर्थ बाबिलोनी लोक होत नसून वृत्रासुर होतो, असें सायणाचार्यांच्या आधारानें कोणी टीकाकार सांगतील. मला त्यांना इतकेंच सुचवून ठेवावयाचें आहे कीं लहान मुलांचा बागुलबोवावरील विश्वास उडाल्यावांचून त्यांना ज्याप्रमाणें निर्भयपणें सर्वत्र संचार करण्याचा धीर होत नाहीं, त्याप्रमाणेंच आमच्या विद्वानांचाहि वेदांतील असुरराक्षसांवरील विश्वास उडाल्यावांचून त्यांना वेदांतील विशेषनामांचे ऐतिहासिक आणि भौगोलिक अर्थ करण्याचा धीर होणार नाहीं.

आतां वर उतरून घेतलेल्या वसिष्ठाच्या रक्षोघ्नसूक्तांतील पहिल्या ऋचेचा थोडा विचार केला पाहिजे. त्या ऋचेंतील ‘ अत्रिणः ’ शब्दाचाहि भाष्यकारांनीं राक्षस असाच अर्थ केला आहे. वास्तविक पाहतां त्या ऋचेंत राक्षस हें विशेषण अत्रिणः या शब्दाला लावलें असल्यानें त्याचा अर्थ वेगळा करणें आवश्यक आहे. माझी समजूत अशी आहे कीं ऋग्वेदांत अत्रिणः आणि अत्रयः या दोन बहुवचनांनीं अत्रींचाच बोध होतो. यांपैकीं अत्रयः हें बहुवचन स्वतः अत्रिकुळांतील लोक आणि त्यांचे संबंधी वापरीत असत. त्याच्या उलट अत्रींचे शत्रू त्यांना अत्रिणः म्हणजे राक्षसासारखे खादाड या नांवानें संबोधीत असत. प्रतिपक्ष्यांच्या नांवांची असली अपमानास्पद विकृति सर्वत्रच आढळून येते. इराणांतील सर्वांत प्रसिद्ध गाथांचा लेखक जो जरथुस्त्र, त्याला वसिष्ठानें जाणूनबुजून जरूथ म्हणजे कर्कश अथवा कठोर बोलणारा ही संज्ञा दिली आहे. असो, बाबिलोनवरील स्वारींत अत्रिकुळांतील लोकांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. त्यामुळेंच त्यांच्यांतील एकानें वव्रीच्या पाडावाचें सूक्त लिहिलें आहे. अत्रींचें वव्रींशीं युद्ध संपल्याची संधि साधूनच वसिष्ठानें

'वव्रींत अत्रींचा पूर्ण निःपात होऊं दे,' अशी प्रार्थना केली आहे. 'वर्लिनच्या वेढ्यांत राशियनांचा पूर्ण निःपात होऊं दे,' अशी इच्छा प्रदर्शित करण्यांतलाच हा प्रकार होय !

अत्रि आणि वव्र यांच्यांतील वैराचा निर्देश वसिष्ठाच्या रक्षोघ्नसूक्तांतील १७ व्या ऋचेंतहि आढळून येतो.

प्र या जिगाति खर्गलेव नक्तं अप द्रुहा तन्वं गूहमाना ।
वव्रान् अनंतान् अव सा पदीष्ट ग्रावाणः घ्नन्तु रक्षसः उपब्दै ॥१७॥

'मनांत दुष्ट हेतु धरून जी निशाचरी नग्न देहानें अपरात्रीं भटकत असते ती अनंत वव्रांच्या खालीं सांपडो,' असा अभिशाप या ऋचेंत वसिष्ठानें दिला आहे. या ठिकाणच्या 'अनंतान् वव्रान्' यांचा अर्थ सायणाचार्यांनीं 'ज्यांचा अंत लागत नाहीं अशा गर्तांत' असा केला आहे. पण एका निशाचरीला अनेक गर्तांची आवश्यकता नसल्यानें त्यांचा अर्थ अग्राह्य मानवा लागतो. या सूक्तांतील राक्षसांना वसिष्ठानें आत्रिणः ही संज्ञा दिली असल्यानें प्रस्तुत निशाचरीहि त्याच कुळांतील असली पाहिजे, हें उघड आहे. चर्चाविषयक नग्न निशाचरी अत्रि कुळांतील असावी, अशी शंका येतांच अत्रिपत्नी अनसूया आणि दत्तात्रेयजन्म या आख्यानाची लेखकाप्रमाणेंच वाचकांनाहि आठवण होईल, याविषयीं शंका नाहीं. या पौराणिक कथेमुळें वसिष्ठाच्या त्या ऋचेचा रोख कोणावर होता, हें ऐतिहासिक दृष्टि नसलेल्यांना सुद्धा स्पष्ट दिसून येईल.

असल्या सगळ्या ऋचांचे अर्थ प्राचीन परंपरेप्रमाणें लावावे लागतात. या विशिष्ट प्रकरणीं प्राचीन परंपरा असें सांगते कीं माध्यंदिनसवनांतील दक्षिणाहोमाच्या प्रसंगीं यज्ञकालीं असुरांनीं अंधार करूं नये म्हणजे अर्थात् ग्रहण लागूं नये याकरितां अत्रि कुळांतील एखाद्या व्यक्तीला जी सुवर्णदक्षिणा द्यावी लागते, ती दक्षिणा घेण्याच्या

अधिकारापासून त्याच कुळांतील एका विशिष्ट स्त्रीच्या वंशजांना वंचित केलें होतें. ही माहिती कात्यायनाच्या ग्रंथावरून आणि प्रवराध्यायावरून डॉ. एगलिंगनें शतपथब्राह्मणाच्या भाषांतराच्या दुसऱ्या भागांत ३४६ पानावर दिली आहे. तेव्हां अत्रिकुळांतील एका कुप्रसिद्ध स्त्रीबद्दलच वसिष्ठानें हे उद्गार काढले आहेत, हें उघड आहे.

वेदांतील वव्रि शब्दाचा अर्थ केव्हां केव्हां बाबिलोन होऊं शकतो आणि अत्रींच्या एका सूक्तांत बाबिलोनच्या पाडावाचें वर्णन आलें आहे, ही ब्रुन्होफेरची कल्पना मान्य केल्यास ऐतिहासिक दृष्ट्या किती गोष्टी गृहीत धराव्या लागतात, याचाहि येथें विचार केला पाहिजे. यांपैकीं पहिली गृहीत गोष्ट म्हणजे अत्रींचें एकोणिसावें सूक्त रचलें जाण्यापूर्वीं बाबिलोन ही नामांकित नगरीच्या, कदाचित् राजधानीच्याहि पदवीला जाऊन पोहोंचली होती. इंग्रजी ज्ञानकोशावरून असें कळतें कीं ख्रि. पू. तिसऱ्या सहस्रकांत युफ्रेटिस नदीचा प्रवाह बदलून तो कीश नगरापासून दूर गेला आणि बाबिलोन नगराच्या सन्निध आला. तेव्हांपासून अक्कड प्रांतांतील पहिल्या चार घराण्यांची राजधानी असलेल्या कीशचें महत्त्व कमी होऊन बाबिलोनचें महत्त्व वाढलें. पहिल्या सार्गोन राजानें बाबिलोनला देवळें बांधल्याचे उल्लेखहि आढळतात. पुढें अक्कडची आणि एकंदर सुमेरी साम्राज्याचीहि राजधानी बाबिलोनला आल्यावर अत्रींचें आणि बाबिलोनी लोकांचें युद्ध होऊन बाबिलोन नगर शत्रूंच्या हातीं पडलें. या युद्धाच्या काळीं बाबिलोनमधील वंश, भाषा आणि संस्कृति या सर्व बाबतींत आर्यकुलाचे भाऊबंद असलेल्या सुमेरी लोकांचें वर्चस्व नष्ट होऊन तेथें सेमेटिक लोकांचें प्राबल्य झालें होतें. सुमेरी संस्कृतीच्या प्रदेशांत सेमेटिक लोकांचा प्रवेश ख्रि. पू. २००० या काळाच्या सुमारास झाला. सुमेरी संस्कृतीच्या भरभराटीच्या दिवसांत त्या प्रांतांत ग्रीसप्रमाणें नगरराज्यांची सत्ता चालत असे. पण सेमेटिक लोकांच्या आगमनानंतर पहिल्या सार्गोननें विस्तृत साम्राज्याची स्थापना करून

सभोंवतालच्या प्रांतांवर स्वाऱ्या करण्याला आरंभ केला. सार्गोनच्या साम्राज्याच्या पूर्वेला असलेला अत्रींचा प्रांतहि याच काळीं परतंत्र झाला. या कटु अनुभवामुळेंच रातहव्य आत्रेयानें ' व्यचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये ' हे उद्गार काढले आहेत. नगरराज्यांच्या पतनाचा अनुभव आल्यानंतरच विस्तृत आणि विपुल प्रजेनें संरक्षित अशा स्वराज्याचें ध्येय आर्यांसारख्या फुटीर प्रवृत्तीच्या जनांना पटलें असावें, याविषयीं शंका नाहीं. तेव्हां अत्रींनीं बाबिलोन नगरी जिंकल्याचा काळ सार्गोनच्या नंतरचा असावा, अशी कल्पना सध्या करतां येईल.

प्राचीन काळच्या इतिहासांतून कशु नांवाच्या आर्यवंशी लोकांनीं ख्रि. पू. १७६० च्या सुमारास बाबिलोन जिंकून तेथें सरासरी पांच शतकें राज्य केल्याचा उल्लेख आढळतो. वेदांत कण्व मंडलाच्या पांचव्या सूक्तांत कशू चैद्य या राजाचा प्रभाव वर्णिला आहे. त्याच सूक्तांत अत्रींच्या बरोबर आश्विनीकुमारांनीं शिंजाराला सहाय केल्याची माहिती आली आहे. दहाव्या मंडलांतील चाळिसाव्या सूक्तांत उशना आणि शिंजार यांच्या सहायाला अश्विनीकुमार गेल्याची कथा आढळते. उशना नांवानें येथें भृगूंचा निर्देश केलेला आहे, हें उघड आहे. अत्रींनीं बाबिलोनच्या वेढ्यांत भाग घेतला होता आणि कशूंनीं तेथें पांच शतकें राज्य केलें होतें, यावरून ते उभयता बाबिलोनचे शेजारी होते, असें निःशंकपणें म्हणतां येतें. कशूंचा प्रांत इराणांतील सुसा या प्राचीन राजधानीच्या उत्तरेला होता, असें प्राचीन काळाच्या इतिहासकारांनीं दाखवून दिलें आहे. या सुसा राजधानीशीं अत्रींचा संबंध असल्याचा पुरावा वेदांतून आणि भारतीय ज्योतिषपरंपरेंतून आढळतो. अत्रिमंडलांतील एकविसावें सूक्त सस आत्रेय याच्या नांवावर मोडतें. त्या सूक्तांत ' ऋतस्य योनि ' आणि ' ससस्य योनि ' या ठिकाणीं अधिष्ठित होण्याची अग्नीला सूक्तकारानें प्रार्थना केली आहे. तै. ब्रा. ३-१०-९ या ठिकाणीं आदित्याशीं संगत होणाऱ्या शुष्वार्ष्णेयाचा

उल्लेख आढळतो. वंश ब्राह्मणांत शूष वाह्नेय भारद्वाज असें एक नांव आलें आहे. या सर्व नांवांचा संबंध सुसा, सुषा, शुषा इत्यादि विभिन्न उच्चारांनीं ओळखल्या जाणाऱ्या इराणच्या त्या प्राचीन राजधानीशींच आहे. वराहमिहिराच्या पंचसिद्धांतिकेंत आणि मत्स्य पुराणांतहि सुसा नगरीचा उल्लेख आढळून येतो, असें श्री. हारीतकृष्ण देव यांनीं बंगाल्यांतील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या त्रैमासिकांतून १९३३ च्या अखेरीं दाखवून दिलें होतें. तेव्हां सुसा नगरीशीं असलेला भारतवर्षाचा संबंध आणि सस आत्रेय या नांवाचा सर्वानुक्रमणींतील उल्लेख यांवरून भारतांतील अत्रिकुल एके काळीं त्या प्रांतात रहात होतें, इतपत अनुमान काढतां येतें. अत्रींनाच सूर्यग्रहणाचें ज्ञान प्रथम झालें, अशी माहिती वेदांत आली आहे, तिचा उल्लेख पुढें करावयाचाच आहे. तिच्यावरून भारतीय ज्योतिषांत सुसाचा उल्लेख येण्याचें कारण कळून येईल.

आतां आपल्याला प्रथम शिंजाराचा शोध करावयाचा आहे. माझ्या मतें शिंजार हें सुमेरी लोकांचेंच प्राचीन नांव आहे. 'हिस्टोरियन्स हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड' या ग्रंथाच्या पहिल्या खंडांत सुंगीर या आद्य नांवाचें परिवर्तन होऊन सुमेर नांव प्रचारांत आलें, अशी माहिती आढळते. त्या नांवाशीं वेदांतील शिंजार या नांवाचा संबंध जोडण्याची कल्पना आमच्या देशांतील अधिकारी विद्वानांना रुचावयाची नाहींच. तेव्हां त्या दोन नांवांमधील सादृश्य दाखवून देण्याचे श्रम न करतां बायबलांतील अक्कड आणि शिनार या द्वंद्वांतील दुसऱ्या नांवाशीं शिंजार शब्दाचा संबंध जोडण्याचा प्रयत्न करणें अधिक चांगलें. बायबलांतील "प्रभूच्या कृपे"नें कदाचित् आमच्या अधिकारी विद्वानांना शिनार, शिंजार आणि सुंगीर या सुमेरच्या नांवांच्या त्रिपुटींतील मूलभूत ऐक्याचा साक्षात्कार होईल. "प्रभुकृपा" ज्यांच्यावर होण्याचा संभवच नाहीं, अशा अभाग्यांच्या करितां 'केंब्रिज एन्शंट हिस्टरी' या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडांतील २३२ पानावरील एक वाक्य

उतरून घेतलें पाहिजे. ‘Friendly relations were opened by Egypt with the chief of Sengara, doubtless the Sinjar Hills between the Euphrates and Tigris, now occupied by the Yazidis.’ या उताऱ्यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं टैग्रीस आणि युफ्रेटिस या नद्यांमधील सिंजार टेकड्यांच्या प्रदेशांतील लोकांना इजिप्तचे लोक सेंगार म्हणत असत. हे सेंगार कदाचित् स्वतःला सुंगीर म्हणवून घेत असतील. पण त्यापेक्षां युरोपीय संशोधकांनीं तें नांव वाचण्यांत चूक करून त्यांना ती संज्ञा दिली असणें अधिक शक्य आहे. तें कसेंहि असो. सिंजारांच्या नांवापासूनच प्रथम सेंगार आणि पुढें सुमेर हीं नांवें उद्भवलीं आहेत, याविषयीं शंका नाहीं. ‘अत्रींसह शिंजारांवर अश्विनीकुमारांची कृपा झाली होती,’ या ऋग्वेदांतील वचनावरून त्या उभयतांच्या परस्परसंबंधांप्रमाणेंच आर्य आणि सुमेरी संस्कृतींचाहि परस्परसंबंध सिद्ध होतो. ‘यथाचित् कण्वम् आवतम् प्रियमेधम् उपस्तुतम् । अत्रिम् शिंजारम् अश्विना’ (८-५-२४) या वचनावरून शिंजारांच्या बरोबर प्रियमेधकुळ आणि कण्वकुळ यांचाहि संबंध असल्याचें सिद्ध होतें. पण त्यांचा शोध करण्याला सध्या सवड नाहीं.

अत्रींचा सुमेरी संस्कृतीशीं असलेला संबंध सूचित करणाऱ्या आणखी एका घटनेचा येथें उल्लेख केला पाहिजे. अत्रिमंडलांतील चाळिसाव्या सूक्ताच्या अंतीं मंत्रकारानें म्हटलें आहे.

> यं वै सूर्यम् स्वर्भानुः तमसा अविध्यत् आसुरः ।
> अत्रयः तम् अनु अविंदन् नहि अन्ये अशक्नुवन् ॥ ९ ॥

म्हणजे स्वर्भानूनें तमानें सूर्याला ग्रासलें असतां केवळ अत्रिकुळांतील लोकांनाच सूर्य परत मिळवितां आला; इतरांना ती गोष्ट शक्य झाली नाहीं. कै. शं. बा. दीक्षित यांनीं या ऋचेकडे

वेदाभ्यासकांचें लक्ष्य वेधल्यापासून सर्व संशोधकांना ती परिचित झालीच आहे. तरीसुद्धा तिच्यावरून निघणारें ऐतिहासिक अनुमान विश्वविद्यालयांतील विद्वानांना आजपर्यंत सुचलेलें नाहीं. प्राचीन काळीं सुमेरबाबिलोनियांत ज्योतिर्विद्येचा प्रथम उदय झाला, अशी पाश्चात्य पंडितांची सर्वसामान्य समजूत आहे. तेव्हां सूर्यग्रहणाचें ज्ञान आपल्याव्यतिरिक्त इतर कोणालाहि नाहीं, असें निक्षून सांगणाऱ्या अत्रींचा निवास त्यांच्या शेजारीं असूं शकेल, अशी कल्पना केल्यास ती तर्कशास्त्राशीं सुसंगतच होईल. अत्रि आणि सुमेरी यांच्यापैकीं कोणाला तें ज्ञान प्रथम प्राप्त झालें असावें, याविषयीं वाद होऊं शकेल. पण ते परस्परांचे शेजारी असावेत या कल्पनेवर कोणताहि आक्षेप घेतां येणार नाहीं. अर्थात् आमच्या परंपरेप्रमाणें ज्योतिर्विद्येंतील अत्रींचा अग्रपूजेचा अधिकार मला पूर्णपणें मान्य आहे. कारण सारी सुमेरी संस्कृति अत्रींचें प्रमुख निवासस्थान जी सुसा नगरी, तिच्यापासूनच उद्भवली आहे, ही वस्तुस्थिति सर्व संशोधकांना मान्य आहे. ग्रहणांपासून यज्ञाचें संरक्षण करण्याकरितां अत्रिकुलोत्पन्नाला सुवर्णदक्षिणा देण्याच्या परंपरेचा वर उल्लेख आलाच आहे.

सुमेरी संस्कृतीच्या प्रांतांत बाबिलोनियाचें वर्चस्व प्रस्थापित झाल्यानंतर सुमेरी लोकांप्रमाणेंच अत्रींनाहि कांहीं काळ त्यांच्या अमानुष अत्याचारांचा अनुभव घ्यावा लागला असावा, असें ऋग्वेदांतील अनेक सूक्तांवरून दिसतें. भुस्सा पेटविलेल्या खोलींत कोंडून अत्रींचा छळ केल्याचें वर्णन वेदांत आलें असून त्या छळापासून त्यांचें रक्षण अश्विनीकुमारांनीं केल्याबद्दल त्यांचीं अनेकांनीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं आहेत. बाबिलोनी लोकांच्या दास्यांत अत्रींना जें अग्निदिव्य करावें लागलें त्याचा वचपा त्यांनीं पुढें बाबिलोन नगरी जाळून घेतला. बाबिलोन जिंकल्याचा आर्यांना किती अभिमान वाटत होता, हें 'क्रतुम् सचन्ते वरुणस्य देवा राजामि कृष्टेः उपमस्य वव्रेः' (४-४२-१) या

उद्गारावरून सुव्यक्त होतें. या वचनावरूनहि वरुणपूजकांनीं वव्रि जिंकून तेथें राज्य केल्याची निश्चित माहिती मिळते. येथें सायणाचार्यांनीं वव्रीचा अर्थ स्वर्ग असा केला आहे. हा अर्थ पाहून त्यांच्या कल्पकतेचें कौतुक करावेंसें वाटतें. पण वव्र, वव्रा, वव्रि यांचे वृत्र, गर्ता, नरक, स्वर्ग यांसारखे परस्परविरोधी, निदान अपरस्परसंभूत अर्थ करण्यापेक्षा बॉबिलोन आणि बाबिलोनी लोक असे परस्परसंभूत अर्थ करणें अधिक सुसंगत दिसेल आणि ऐतिहासिक दृष्ट्याहि उपयुक्त ठरेल, अशी माझी समजूत आहे. तरीसुद्धा वेदांचें दुर्दैव सरेपर्यंत हे अर्थ अधिकारी विद्वानांना पटणें अवघडच आहे !

अत्रींनीं सूर्यग्रहणाच्या प्रसंगीं सूर्याची मुक्तता घडवून आणल्याचा उल्लेख वर आलाच आहे. त्या उल्लेखावरून तें सूर्यग्रहण कधीं घडलें असावें, हें गणितानें काढण्याचा एक अनाठायीं प्रयत्न कलकत्त्याचे श्री. प्रबोधचंद्र सेनगुप्त यांनीं केला आहे. त्यांनीं असें दाखवून दिलें आहे कीं तें ग्रहण हिंदुकूशकाराकोरम या भागांत ख्रि. पू. ३९२८ या वर्षीं २६ जुलैलाच दिसलें. आपल्या प्रबंधाच्या अंतीं ते म्हणतात : 'If this last finding be called into question the name of Atri should be traceable in the past traditions of the Parsis and the Ancient Greeks.' प्रबोधबाबूंचें हें आव्हान स्वीकारून इराण आणि ग्रीस या देशाशीं असलेला अत्रींचा संबंध त्यांना दाखवून देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्राचीन काळीं इराणचे लोक आपल्याला ऐर किंवा ऐल म्हणवून घेत असत. याकरितांच तेथील सम्राट् स्वतःला 'मलकान् मलका ऐरान् ओ अनिरान्' किंवा 'मलकान् मलका ऐलान् ओ अनिलान्' अशी पदवी लावीत असत. असा उल्लेख केला कीं हिंदुस्थानांतले अधिकारी विद्वान् उपहासानें हसतात, हें मला माहीत आहे. मला त्यांना इतकेंच सांगावयाचें आहे कीं हे उल्लेख अर्वाचीन काळांतले असले तरी त्यांवरून त्या देशांतील

प्राचीन परंपरेचा पुरावा मिळतो. रेझाशहा जेव्हां स्वतःला पहलवी म्हणवून घेतो, तेव्हां तो प्राचीन पहलवी घराण्याची परंपरा पुनरुज्जीवित करण्याच्या हेतूनेंच ती पदवी लावून घेतो, याची त्यांनीं थोडी आठवण ठेवावी. असो, आतां ऐलांचा अत्रीशीं असलेला संबंध सांगितला पाहिजे. कारण त्या संबंधाची भारतीय विद्वानांना विस्मृतिच झाली आहे. अत्रीचा पुत्र सोम, सोमाचा पुत्र बुध आणि बुधाचा पुत्र पुरूरवा, या वंशपरंपरेमुळें अत्रींचा ऐल घराण्याशीं संबंध येतो. ही परंपरा काल्पनिक आहे, असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. अत्रीचा पुत्र सोम यापासून उद्भवलेलें चंद्रात्रेय हें घराणें महाराष्ट्रांतील सर्वांना माहीत असेल. सोमाचा पुत्र जो बुध, त्या बुधाच्या घराण्याचा अवेस्त्यांत पुध या नांवानें उल्लेख आढळतो. पुढें पुरूरव्याचा नातू जो नहुष, त्याच्या नांवासारखी इराणी सम्राट् स्वतःला 'नख नखान्' म्हणजे नहुषांचे नहुष् अशीहि पदवी लावून घेत असत. प्रत्यक्ष ऋग्वेदांतील एका सूक्तकारानें पृथुश्रवसूकानीत या राजाला नहुष् ही पदवी लाविली आहे. ( ८-४६-२७ ) हा राजा इराणी होता, हें त्या सूक्तांतील तरुक्षबल्बूथादींच्या उल्लेखांवरून ऐतिहासिक दृष्टि असलेल्यांना सहज कळण्याजोगं आहे.

इराणी सम्राटांच्या पदव्यांशीं असलेला अत्रिकुळाचा संबंध सुव्यक्त झाल्यानंतर त्यांचा इराणांतील प्रांतांशीं किती निकट संबंध होता, हें दाखविलें पाहिजे. ऋग्वेदांत ६–५१–१४ या स्थळीं 'जहि नि अत्रिणम् पणिम् वृकः हि सः' अशी प्रार्थना आली आहे. अत्रि वृक कसे याचा येथें आधीं उलगडा केला पाहिजे. अत्रीपासून उद्भवलेल्या सोमवंशालाच वृक ही संज्ञा लावीत असत. 'वृकः चंद्रमा भवति' असें यास्कानें सांगितलें आहे. वृक नांवाच्या आयुधजीवि संघाचा पाणिनीनें उल्लेख केला आहे. प्राचीन इराणांत वृकन् अथवा व्रेकन् नांवाचा एक प्रमुख प्रांत होता. त्याचा उल्लेख ग्रीक लोकांनींहि

केलेला आहे. प्रत्यक्ष ऋग्वेदांत शांतनूला औलान ही संज्ञा लाविली आहे. हा औलान शब्द ज्या उल शब्दापासून उद्भवला त्याचा अर्थ वृक असाच आहे. शांतनूच्या वंशजांतील वृकोदर भीमाचा परिचय प्रत्येक भारतीयाला बाळपणापासूनच झालेला असतो.

अत्रींचें एक प्रमुख निवासस्थान जी सुसा नगरी, तिच्या प्रांतांत उला नांवाची नदी आणि कुरुक्षेत्र पर्वत असल्याची माहिती केंब्रिज प्राचीन इतिहासाच्या पहिल्या खंडांतील ५६६ पानांवरील मानचित्रांत आली आहे.

अत्रींचा इराणशीं असलेला संबंध ग्रीकांच्या पौराणिक इतिहासांतूनहि आढळून येतो, ही खरोखरी नवलाची गोष्ट आहे. होमरच्या महाकाव्यांतील हेलेनचा पति आणि दीर, मेनेलास आणि आगामेनन हे अत्रियसचे ( म्हणजे अत्रिकुलोत्पन्नाचेच ) वंशज होते. अत्रियस स्वतः पर्सियस राजाचाच नातू होता. पर्सियस हा पूर्वेकडील देशांतून ग्रीसमध्यें येऊन तेथील राजा झाला, असें ग्रीक पुराणकर्ते सांगतात. पर्शियसची पत्नी अँद्रोमीदा ही तिच्या नांवावरूनच मेद किंवा मीड कुळांतील होती, असें स्पष्ट दिसतें. तिच्या प्राप्तीकरितां पर्सियसला ज्या गॉर्गन नांवाच्या राक्षसीचा नाश करावा लागला, तिच्या नांवाचा वेर्कान् प्रांताशीं असलेला संबंध भाषाशास्त्रज्ञांनीं पूर्वींच मान्य केला आहे. या साऱ्या विवेचनाविरुद्ध अधिकारी विद्वानांना घुणाक्षरन्यायाचा आश्रय घेतां येईल, पण प्रतिक्षणीं त्या न्यायाचा आश्रय घेणें न्यायशास्त्राच्या विरुद्ध आहे, हें त्यांनींहि लक्ष्यांत ठेवावें.

अत्रींचें मुख्यतः आंगिरसांशीं वैर होतें, असें ऋग्वेदांतील वचनांवरून वाटतें. ' बृहस्पते तपुषाश्नेव विध्य वृकद्वरसो असुरस्य वीरान् । यथा जघंथ धृषता पुरा चित् एवजहि शत्रून् अस्माकम् इंद्र ॥ ( २–३०–४ ) या ऋचेंत स्वतःला वृकश्रेष्ठ म्हणविणाऱ्या असुरांच्या वीरांना मारण्याबद्दल गृत्समदानें बृहस्पतीची प्रार्थना केली

आहे. बृहस्पतीला भरद्वाज बार्हस्पत्यानें आंगिरस ही संज्ञा लाविली आहे, त्यावरून त्या उभयतांचें ऐक्य व्यक्त होतें. वृकांच्या वैरामुळेंच आंगिरसांना सर्वांच्या आधीं इराण सोडून हिंदुस्थानाचा मार्ग सुधारावा लागला. शुतुद्रि आणि विपाशा या नद्या ओलांडून भारतांत आलेल्या विश्वामित्रानें आपल्याला आंगिरसांचा आश्रय मिळावा, अशी इच्छा व्यक्त केली आहे. ' **इमे भोजा अंगिरसो विरूपाः दिवस्पुत्रासो असुरस्य वीराः। विश्वामित्राय ददतो मघानि सहस्रसावे प्रतिरंत आयुः॥** ( ३–५३–७ ) अत्रि आणि आंगिरस, किंवा वृक आणि बृहस्पति यांच्या पुरातन वैराची स्मृति आतां पुराणांतील ताराहरणाच्या कथेंत मात्र उरली आहे. बृहस्पतीची पत्नी तारा हिचें सोमानें अर्थात् वृकाधिपतीनें हरण केलें आणि तिच्यापासून त्याला बुध हा पुत्र झाला. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील १०९ सूक्तांतहि या कथेचा अस्पष्ट आभास आढळून येतो. वृकांप्रमाणेंच इराणांतील धर्मसुधारकांनींहि तेव्हां आंगिरसांवर शस्त्र उचललें होतें, असें जरथुस्त्राच्या गाथांवरून कळतें. यस्न ४४ मध्यें त्यानें आंगिरस् उशिजावर हल्ला चढविला आहे. यस्न ४८ मध्यें आंगिरसांचें नांवच घेऊन त्यानें त्यांच्यावर मूर्तिपूजेचा आरोप केला आहे. आंगिरसांप्रमाणेंच कवि म्हणजे भृगु आणि करप अर्थात् कृप या कुळांची निंदाहि जरथुस्त्राच्या गाथांतून पदोपदीं आढळते. पण येथें आपल्याला मुख्यतः आंगिरसांच्याविषयीं विचार करावयाचा आहे. ऋग्वेदांतील दुसरें मंडल गृत्समदाचें आहे. हा गृत्समद प्रथम आंगिरस् असून नंतर भृगुकुलांत समाविष्ट झाला, अशी परंपरागत माहिती आहे. गृत्समदाला इंद्र समजून मारण्याचा प्रयत्न चुमुरि आणि धुनि यांनीं केल्याच्या आख्यायिका निरनिराळ्या तीन स्वरूपांत आढळतात. यावरून इतकेंच समजून येतें कीं त्याच्या इंद्रभक्तीकरितां त्याला इराणी सुधारकांनीं मारण्याचा प्रयत्न केला असतां भृगुकुलाच्या आश्रयाला जाऊन त्यानें आपला प्राण वांचविला.

दुसऱ्या मंडलाप्रमाणेंच ऋग्वेदाचें सहावें मंडलहि आंगिरसांचेंच आहे. कारण त्या मंडलाचे कर्ते भारद्वाज हे आंगिरसकुलोत्पन्नच होते. या भारद्वाजांपैकीं बार्हस्पत्य भारद्वाज हा सम्राट् चायमानाच्या सन्मान्य आश्रितांपैकीं होता, हें या प्रकरणाच्या प्रारंभींच आलें आहे. पण ही राजकृपा पुढच्यां पिढीला टिकली नसावी अशी शंका येते. कारण भारद्वाजांचें स्वतंत्र मंडल असूनहि पुढें दहाव्या मंडलांत पायु भारद्वाजाचें यातुधानांचा संहार करण्याकरितां अग्नीची प्रार्थना करणारें एक सूक्त आलें आहे. पण त्या सूक्तांत वसिष्ठाच्या रक्षोघ्नसूक्ताचा त्वेष नसल्यानें आणि त्याचे संदर्भहि नसल्यानें मनाचा निर्णय होत नाहीं. त्या सूक्तावरून निर्णय होत नसला तरी जरथुस्त्री धर्मांतील सैतान जो अंग्रमन्यु त्याला आंगिरसांची आठवण देणारेंच नांव दिलेलें असल्यानें नव्या धर्माच्या साम्राज्यांत त्यांचे किती हाल झाले असतील, याची कोणालाहि सहज कल्पना करतां येईल. तरीसुद्धा औशिज कक्षीवानानें निर्भयपणें म्हटलें आहे.

'किम् इष्टाश्व इष्टरश्मिः एत ईशानासः तरुष ऋञ्जते नॄन्' ( १–१२२–१३ ) 'इष्टाश्व काय किंवा इष्टरश्मि काय, हे आम्हां (देवभक्तांचें किंवा यजनशीलांचें) काय वाकडें करूं शकणार आहेत,' या ऋचार्धांतील इष्टाश्व जरथुस्त्राचा आश्रयदाता विश्तास्प राजाच असावा, असें भरूचा आणि होडीवाला यांच्या सारख्या पारशी तज्ज्ञांनीं सुचविलें आहे. त्यांची कल्पना मलाहि पटते.

शतपथ ब्राह्मणाच्या चौथ्या कांडांत भृगुआंगिरसांनीं स्वर्गगमन केल्यानंतर वृद्ध च्यवन तेवढा मागें राहिल्याची कथा आली आहे. याचा अर्थ मी इतकाच करतों कीं भृगुआंगिरसांनीं देशत्याग केल्यानंतर च्यवनांचें कुळ तेवढेंच उत्तर इराणांत राहिलें. कारण च्यवनाच्या कथेंत किंवा पुरूरव्याच्या कथेंत शतपथ ब्राह्मणांतून येणारे कुरुक्षेत्राचे उल्लेख

केवळ इराणी कुरुक्षेत्रालाच लागू पडतात. इराणच्या अर्वाचीन मानचित्रांतूनहि कुरुकोह अर्थात् कुरुगिरि पहावयाला मिळतो. केंब्रिजच्या प्राचीन इतिहासाच्या पहिल्या खंडांतील इलामच्या मानचित्रांत केरेखत्र या इंग्रजी विकृतींत कां होईना पण कुरुक्षेत्राचेंच दर्शन होतें. चायमानाच्या सेनापतींपैकीं तूर्वयाण आणि वध्र्यश्व हे च्यवनकुळांतले होते, हें वर आलेंच आहे. असो, शतपथाच्या कथेप्रमाणें भृगुआंगिरसांनीं बहुधा एकत्रच देशत्याग केला असला तरी भृगूंचा भारतप्रवेश मात्र मागाहून झाला असावा, असें वाटतें. नाहींतर आंगिरसांप्रमाणेंच त्यांचाहि उल्लेख विश्वामित्रानें केला असता.

या प्रास्ताविक प्रकरणांत दाशराज्ञयुद्धाची पार्श्वभूमि संक्षेपानें वर्णिली आहे. हा विषय वाचकांना सर्वस्वीं अपरिचित असल्यामुळें त्यांतील मुख्य मुद्दे पुन्हा एकदा सूत्ररूपानें मांडावेसे वाटतात.

(१) दाशराज्ञ युद्धांत एका पक्षाचा नेता सुदास राजा होता तर विरुद्ध पक्षाचा नेता पार्थव सम्राट् अभ्यावर्ती चायमान हा होता.

(२) अतिथिग्वदिवोदासासारखे सुदासाचे पूर्वज एकेकाळीं चायमानाचे अंकित असून ते आपल्या सम्राटाकरितां शंबर, वराशिख, वर्ची इत्यादिकांशीं इराण देशांत लढत होते.

(३) चायमानाची राजधानी अर्वाचीन खुरासान किंवा प्राचीन पार्थिया येथील अबीवर्द (संस्कृत अभीवर्त) ही नगरी होती. ऋग्वेदांतील अभीवर्त सूक्त (१०–१७४) हें राजाच्या यशाप्रीत्यर्थ म्हणण्याचा प्रघात होता आणि वसिष्ठानेंहि अथर्ववेदाच्या पहिल्या कांडांत अभीवर्तमण्याचें सूक्त रचून आपलें राष्ट्र निर्भय करून ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. या मागाहून लक्ष्यांत आलेल्या संदर्भावरून दाशराज्ञयुद्धकालीं अभीवर्तमाहात्म्य किती होतें, याची कल्पना येते. अभीवर्तनगरीचें उत्खनन झाल्यास वेदकालीन इतिहासावर नवा प्रकाश पडेल.

(४) चायमानाशीं लढलेले वराशिख हे बदकशानमधील वरसख नदीकांठचे लोक होत आणि त्यांना सहाय करणारे वृचीवंत बहुधा यदुकुलोत्पन्न होते. त्यामुळेंच ते तुर्वशांच्यासह वराशिखांना सहाय करतांना आढळतात.

(५) महाराष्ट्रांतील वेदाभ्यासकांचे अग्रणी कै. बाळ गंगाधर टिळक यांच्या मताविरुद्ध मी शंवरांचं ऐतिहासिक अस्तित्व मानतों आणि त्यांचा मुख्य निवास इराणच्या उत्तरेकडील अर्वाचीन सुंबर नदीच्या कांठीं, होता, असें समजतों. तेथून ते अन्यत्र पसरले होते. पण तो विषय सध्या बाजूला सारणें भाग आहे.

(६) चायमानाचें पश्चिमेला बाबिलोनशीं युद्ध जुंपलें असतांना सुदासाचा पितामह अतिथिग्व यानें पार्थव युवराज सुश्रवसावर स्वारी केली. तेव्हां च्यवनकुलोत्पन्न तूर्वयाणानें त्याचा सपशेल पराभव करून कुत्स, अतिथिग्व आणि आयु या तिघांना युद्धबंदी केलें.

(७) अतिथिग्वाचा पुत्र दिवोदास याला च्यवनकुलोपन्न वध्र्यश्वानें सरस्वतीतीरावर पकडलें. वध्र्यश्व दिवोदासाचा पिता नव्हे.

( ८ ) कुत्स, अतिथिग्व आयु आणि दिवोदास हीं सारीं एकाच व्यक्तींचीं नांवें आहेत, असें प्रतिपादणाऱ्या लोकांचें साहस अगदीं अचाट असलें तरी त्यांच्या चिकित्सक बुद्धीविषयीं फार संशय आहे.

(९) अत्रिमंडलांतील १९ व्या सूक्तांत बाबिलोनच्या पाडावाचें वर्णन आलें आहे, ही ब्रुन्होफेरची कल्पना सायणाचार्यांच्या भाष्यावरूनहि मनाला पटते.

(१०) ऋग्वेदांत इतरहि अनेक स्थळीं बवि आणि बव्र असे जे शब्द आढळतात, त्यांचा अर्थ बाबिलोन आणि तेथील लोक असा होऊं शकतो.

(११) बाबिलोन येथील सेमेटिक् वंशाच्या सम्राटांनीं त्यांच्या पूर्वसीमेवरील सुशियाना प्रांतांत राहणाऱ्या अत्रि कुळाचा छळ केल्यामुळेंच अत्रि लोक विस्तृत आणि बहु जनांनीं संरक्षित अशा साम्राज्याची स्थापना करण्याला प्रवृत्त झाले.

(१२) भारतीय ज्योतिष हें अत्रींपासूनच उद्भवलें असून सुसा नगरींत त्याची प्रथम जोपासना झाल्यानें त्या नगरीचे उल्लेख भारतीय ज्योतिषपरंपरेंत आढळतात. सूर्यग्रहणाचें ज्ञान अत्रींनाच असल्यामुळें माध्यंदिनसवनाच्या प्रसंगीं असुरांनीं प्रकाश नष्ट करूं नये याकरितां अत्रिकुलोत्पन्नाला सुवर्णदाक्षिणा देण्याचा प्रघात असल्याचें शतपथ ब्राह्मणावरून समजतें.

(१३) अत्रींच्या प्रमाणेंच शिंजारांचेंहि अश्विनीकुमारांनीं संरक्षण केल्याचा ऋग्वेदांत उल्लेख आहे. याचें महत्त्व असें आहे कीं शिंजार हें सुमेरी लोकांचेंच प्राचीन नांव असल्यानें ऋग्वेदांतील संस्कृतीशीं त्यांचा साक्षात् संबंध असल्याचें या उल्लेखानें सिद्ध होतें.

(१४) सोमकुल किंवा ऐलकुल हें अत्रींपासून उद्भवलें असून नहुष ही इराणांतील राजांची पदवी होती.

(१५) सोमकुलाचें अपर नाम वृक होतें आणि या वृकांशीं आंगिरसांचें वैर उद्भवल्यामुळें वेदांतील विविध गोत्रांपैकीं आंगिरस लोक आर्यावर्तांत प्रथम आले.

(१६) जरथुस्त्राच्या गाथांतून त्याच्या आंगिरसविरोधी भावना व्यक्त झाल्या आहेत.

या विभिन्न विषयांचा विस्तारानें विचार करणें प्रस्तुत प्रबंधाच्या मर्यादेंत शक्यच नव्हतें. तरीसुद्धा प्रत्येक मुद्दा सिद्ध करण्याला आवश्यक तितका पुरावा मी दिला आहे, अशी माझी समजूत आहे.

# वसिष्ठ आणि जरथुस्त्र

एखाद्या काळांत पुरोहितवर्गाला जें महत्त्व प्राप्त होतें, तें केवळ त्या वर्गाच्या कारस्थानीपणामुळें प्राप्त होत नसून तत्कालीन परिस्थितींत धार्मिक प्रश्नांच्या. निर्णयावर राष्ट्रांचें भवितव्य अवलंबून असलें, तरच प्राप्त होतें. धार्मिक प्रश्नांचें महत्त्व धर्मक्रांतीच्या काळांत सर्वांत अधिक असतें, हें सांगायला नकोच. पर्शुभारतीय आर्यांच्या संयुक्त इतिहासांतील शेवटची धर्मक्रांतीचा प्रसंग म्हणजे जरथुस्त्री धर्माच्या जननाचा प्रसंग होय. याच विशिष्ट काळांत परंपरागत धर्मावर ओढवलेल्या अकल्पित संकटाचा प्रतिकार करणें, हें भारतीय राजांना आपलीं इतर सर्व कर्तव्यें संभाळून करतां येईना. यामुळें त्यांना आपलीं धार्मिक कर्तव्यें पुरोहितांवर सोंपवावीं लागलीं. याचवेळीं ब्राह्मण आणि क्षत्रिय हे वर्ण परस्परापासून विभिन्न होऊं लागले असावेत. ही वस्तुस्थिति कळायला इतिहासलेखकाला प्रामाणिक बुद्धि आणि ऐतिहासिक दृष्टि यांचा लाभ व्हावा लागतो. पण आमच्या देशांतील बहुतेक इतिहास यांच्या अभावींच लिहिले जात असल्यानें भारतीय इतिहासाचा उलगडा आजपर्यंत कुणालाच झालेला नाहीं.

आपल्या इतिहासांत दाशराज्ञयुद्धाच्या प्रकरणांत पुरोहितांचा प्रथम प्रामुख्यानें उल्लेख झालेला आढळतो. यामुळें इथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं दाशराज्ञयुद्धापूर्वीं जरथुस्त्री धर्मक्रांति घडून आली होती, याला पुरावा काय ? या प्रश्नाला सविस्तरच उत्तर दिलें पाहिजे. कारण ऋग्वेदांत प्रत्यक्ष जरथुस्त्राचे उल्लेख असावेत, अशी शंका आजपर्यंत श्री. जयनाथ पति यांनीं ‘ इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्लींतील ’

(१९२९ जून) आपल्या 'जरथुस्त्राचा काळ' या प्रबंधांतून व्यक्त केल्याचें एकच उदाहरण मला माहीत आहे. तरीसुद्धा ऋग्वेदांतील जरूथ म्हणजे जरथुस्त्रच अशी त्यांच्या मनाची निश्चिति न झाल्यानें त्यांना त्या कल्पनेचा कांहींच उपयोग करून घेतां आला नाहीं. याचें एक कारण असें आहे कीं जरथुस्त्राच्या गाथांतून एकदोन ठिकाणीं विदुर हा शब्द आढळतो आणि तो महाभारतांतील विदुराला अनुलक्षून वापरला आहे अशी त्यांची समजूत झाली आहे. त्यांनीं निर्देशिलेल्या २८ आणि ४५ या गाथांतून मला स्वतःला तरी विदुर हा शब्द आढळला नाहीं. त्यांतून विदुश् असें एक क्रियापद मात्र आढळतें. त्या क्रियापदानें कदाचित् श्री. जयनाथांचा घोटाळा झाला असावा. त्याव्यतिरिक्त युधिष्ठिर हाच जरथुस्त्र, अशीहि त्यांची समजूत झाली असल्यानें ऋग्वेदांतील संदर्भाचा त्यांना सदुपयोग करतां आला नाहीं·

जरथुस्त्राच्या मृत्यूचे उल्लेख ऋग्वेदांत निदान तीन ठिकाणीं तरीं आले आहेत. आकाशांतून वीज पडून जरथुस्त्राला मरण आलें, किंवा त्याच्या विरुद्ध पक्षाच्या पुरोहितांपैकीं एकानें त्याला मारून टाकलें; अशीं त्या इराणी धर्मप्रवर्तकाच्या अंतासंबंधीं दोन भिन्न मतें प्रचलित असल्याचें जॅक्सनकृत जरथुस्त्रचरित्रावरून समजतें. नवलाची गोष्ट ही कीं या दोनहि मतांचा उल्लेख ऋग्वेदांत भिन्न भिन्न स्थळीं आढळतो. अग्निरद्भ्यो निरदहज्जरूथम्, (१०.८०.३) म्हणजे अंतरिक्षांतील अग्नीनें अर्थात् विजेनें जरूथाला जाळून भस्म केलें. सातव्या मंडलांतील पहिल्या सूक्तांतहि 'विश्वा अग्नेऽप दहारातीर्येभिस्तपोभिरदहो जरूथम्' म्हणजे पूर्वी जरूथाला जसें जाळून टाकलेंस, तसेंच (त्याच्याशीं संबंध असलेल्या) आतांच्या शत्रूंनाहि हे अग्ने, तूं जाळून टाक; अशी अग्नीची वसिष्ठानें प्रार्थना केली आहे. यापेक्षाहि अधिक महत्त्वाचा उल्लेख सप्तमंडलाच्या नवव्या सूक्ताच्या अंतीं आढळतो. 'त्वामग्ने समिधानो वसिष्ठो जरूथं हन्यक्षि राये पुरंधिम्' अग्नीला समिधा अर्पण

करणाऱ्या वसिष्ठानें जरूथाला ठार मारलें, इतकी नक्की माहिती या वचनावरून मिळते. तेव्हां जरथुस्त्राच्या अंतासंबंधींच्या दोनहि मतांचा ऋग्वेदांत उल्लेख आला आहे, याविषयीं शंका नाहीं. वेदांतील नांवांतून जरथुस्त्राच्या नांवांतील अंत्य उस्त्र तेवढाच गाळला आहे. उरलेलें नांव मूळच्या इराणी नांवाशीं अतिशय सदृश आहे. यहुदी लोकांनींहि जरथुस्त्राला जराथ या नांवानें संबोधलें आहे. त्याच्या नांवावर श्लेष करून त्याला महारोग झाल्याची कथाहि त्यांनीं रचली आहे. प्रतिपक्षयांच्या नांवांची अशी निटंबना करणें हा मनुष्यस्वभावाचा एक सर्वत्र दिसून येणारा दोष आहे. जरथुस्त्राचें जरूथ असें रूपांतर याच स्वभावदोषामुळें झालें असावें, असें मला वाटतें. कारण वेदांतील जरूथ शब्दाचा अर्थ क्रूर आणि कर्कश बोलणारा असा आहे. तेव्हां गाथा रचून धर्मप्रसार करणाऱ्या जरथुस्त्राला वसिष्ठादि सनातनी नेत्यांनीं जरूथ ही संज्ञा हेतुपुरस्सर लाविली असावी, हें उघड आहे.

वसिष्ठांचें कुळ हें मुख्यतः ब्राह्मणमनोवृत्तीचें कुळ होतें. भार्गवांच्या प्रमाणें हातीं शस्त्र घेण्याबद्दल त्यांची प्रसिद्धि नाहीं. तेव्हां त्यांनीं शबरांप्रमाणें एखादा लढाऊ शत्रू मारला असेल असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. प्रत्यक्ष दाशराज्ञयुद्धांतसुद्धां प्रार्थना म्हणून सैन्याला उत्तेजन देण्यापलीकडे त्यांनीं कोणताहि भाग घेतला नव्हता. तेवढ्यावरूनहि ते सामान्यतः वाचिवीर्यांच्या वर्गांत पडत होतें हें कळून येतें. दाशराज्ञयुद्धापूर्वी नुकतेच वसिष्ठ भरतांचे पुरोहित झाले होते, असें त्यांच्या मंडलांतील ६३ व्या सूक्तांतील पुढील ऋचेवरून समजतें.

दंडा इवेद्गो अजनास आसन्परिच्छिन्ना भरता अर्भकासः।
अभवच्च पुर एता वसिष्ठ आदित्तृत्सूनां विशो अप्रथन्त ॥ ६ ॥

भरत वंशाचे लोक अगदीं अनाथ झाले असतांना वसिष्ठांनीं त्यांचें पौरोहित्य स्वीकारलें आणि तेव्हांपासूनच त्यांचा उत्कर्ष झाला, असा या

ऋचेचा सारांश आहे. या वचनावरून असें वाटतें कीं जरथुस्त्राच्या हत्येनंतर हिंदुस्थानांत आल्यावरच वसिष्ठांनीं सुदासाच्या कुळाचा आश्रय केला असावा. वसिष्ठांना इराण्यांची चांगली माहिती होती, असें त्यांच्या दाशराज्ञयुद्धविषयक सूक्तांवरून दिसून येतें.

इथें कोणाला अशी शंका येईल कीं वसिष्ठानें जरथुस्त्राला जर बहुधा त्याच्याच अग्न्यागारांतील अग्नींत लोटून जाळून टाकलें असलें तर वीज पडून जरथुस्त्र जळून मेल्याची कथा कशी प्रचलित झाली? या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं अवेस्ता ग्रंथांत वाजिष्ट या शब्दाचा अर्थ विद्युत् वन्हि असा असल्यानें वसिष्ठानें जरथुस्त्राला जाळल्याची वार्ता भारतीय उच्चारांच्या व्यक्तींच्या तोंडून ऐकून विजेच्या योगानें जरथुस्त्र जळून मेला, अशी कांहीं इराण्यांची समजूत होणें साहाजिक आहे. (त्या काळीं इराणांत 'स'चा उच्चार 'स' करणारे आणि 'ह' करणारे असे उभयविध लोक होते. पैकीं 'ह' उच्चारणार इराणांत राहिले आणि इतर हिंदुस्थानांत आले.) जरथुस्त्रासारख्या प्रेषिताला मानवाच्या हातून मरण येण्यापेक्षा स्वतः परमेश्वराकडून वरचें निमंत्रण येणें अधिक स्वाभाविक, या भावनेनेंहि विद्युत्पाताची आख्यायिका सर्वतोमुखीं होण्याला सहाय झालें असेल. याच कल्पनेचा अनुवाद ऋग्वेदाच्या दशम मंडलांत आणि ग्रीक वाङ्मयांत झालेला आढळतो. पण सप्तम मंडलांतील अत्यंत सुस्पष्ट वचन पुराव्यांत समाविष्ट झाल्यानंतर जरथुस्त्राचा हंता कोण याविषयीं आतां संशय बाळगण्याचें कारण नाहीं.

वसिष्ठ आणि जरथुस्त्र यांच्यांत इतकें प्राणांतिक वैर उद्भवण्याचें कारण काय, याचा आतां थोडा विचार केला पाहिजे. जरथुस्त्राच्या गाथांतून त्यानें आपल्या प्रतिपक्ष्यांवर ऐहिक प्रतिष्ठेच्या अभिलाषाचा आरोप केला आहे. तेव्हां हेंच त्या उभयतांमधील भांडणाचें आदिकारण होतें, असें म्हणण्याला प्रत्यवाय दिसत नाहीं. वसिष्ठांच्या पुरतें बोलावयाचें तर जरथुस्त्राचा आरोप त्यांना पूर्णपणें मान्य होता. आपल्या

मंडलांतील पहिल्याच सूक्तांत आपली प्रतिष्ठाभिलाषा त्यांनीं सुस्पष्ट रीतीनें व्यक्त केली आहे.

स मर्तो अग्ने स्वनीक रेवान् अमर्त्ये य आजुहोति हव्यम् ।
स देवता वसुवनिं दधाति यं सूरिरर्थी पृच्छमान एति ॥ २३ ॥

अमर्त्यांना जो आहुति देतो, त्याचप्रमाणें त्यांच्या कृपेनें जो ऐश्वर्यलाभ करून घेतो आणि ऐश्वर्येच्छु लोक ज्याला उपदेश विचारावयाला येतात, तोच खरोखर भाग्यवान् पुरुष होय; असा या ऋचेचा सारांश आहे. या सुखाच्या कल्पना थोरांना शोभतील अशाच असल्या तरी त्या मुख्यतः इहलोकांतील अभ्युदयाच्या कल्पना आहेत. प्रतिष्ठा हेंच जीवनसर्वस्व मानणाऱ्या व्यक्तींनीं समाजांतील आपली परंपरागत प्रतिष्ठा टिकविण्यासाठीं पराकाष्ठेचा प्रयत्न करणें स्वाभाविकच आहे. या महत्त्वाच्या कारणाकरितां वसिष्ठ आणि जरथुस्त्र यांच्यांत वितुष्ट उत्पन्न झालें असल्यास नवल नाहीं. कारण पर्शुभारतीय जन एकत्र आणि एकधर्मी असतांना केवळ वसिष्ठ कुळांतील व्यक्तींनाच यज्ञांतून ब्रह्मा हें पद मिळत असे, अशा आशयाचा शतपथ ब्राह्मणांत उल्लेख आला आहे. ऋग्वेदांत वसिष्ठाच्या नांवावर दिलेलीं सूक्तें, अथर्ववेदांत ब्रह्मा या नांवाखालीं दिलेलीं आढळतात. स्वतः इंद्रानेंच म्हणे हें पद वसिष्ठांना दिलें होतें! यावरून वसिष्ठांची सनातनी जगांतील प्रतिष्ठा आणि त्या प्रतिष्ठेला जरथुस्त्री पंथाच्या उदयामुळें पोंचलेला धक्का, या दोहोंचीहि यथार्थ कल्पना येते. एकट्या वसिष्ठांनाच ब्रह्मा करण्याच्या परंपरेविरुद्ध बंड उभारल्यामुळेंच विश्वामित्रानें वसिष्ठांकडून ब्रह्मर्षि म्हणवून घेण्याचा हट्ट धरल्याची कथा उद्भवली असावी. विश्वामित्र आणि वसिष्ठ यांच्या परस्परसंबंधांची पुढें अधिक चर्चा करावी लागणार आहेच.

वसिष्ठांच्या तत्कालीन प्रतिष्ठेचें एक प्रमाण वसिष्ठ या विशेषणाच्या उपयोगावरून मिळतें. अथर्ववेदांत शांताति नांवाच्या मंत्रकारानें एका केशवर्धनी ओषधीचें वर्णन करतांना म्हटलें आहे.

श्रेष्ठमसि भेषजानां वसिष्ठं वीरुधानाम् ।
सोमो भग इव यामेषु देवेषु वरुणो यथा ॥ (६-२१-२)

वसिष्ठाचा शत्रु मानलेल्या विश्वामित्रानेंहि एका रोगनाशन मंत्रांत म्हटलें आहे.

शतं या भेषजानि ते सहस्र संगतानि च ।
श्रेष्ठं आस्त्रावभेषजं वसिष्ठं रोगनाशनम् ॥ (६-४४-२)

वसिष्ठ शब्दाचा हा उपयोग अर्वाचीन संस्कृतांत आढळून येत नसावा. कारण आपट्यांच्या कोशांत वसिष्ठ शब्दाचा एक विशिष्ट ऋषि हा एकच अर्थ दिला आहे.

इथें कोणी असा आक्षेप घेतील कीं वसिष्ठ शब्दाचें माहात्म्य हिंदुस्थानांत एकेकाळीं किती होतें, इतकेंच या अवतरणांवरून समजतें. पण तेवढ्यावरून जरथुस्त्रानें मत्सर आणि द्वेष करण्यासारखी त्यांची प्रतिष्ठा इराणांत होती, हें सिद्ध होत नाहीं. हा आक्षेप यथार्थच आहे. त्याच्या निरसनाकरितां वसिष्ठ शब्दाची इराणांतील प्रतिष्ठाहि सिद्ध करणें आवश्यक आहे. माधव जूलियन् यांनीं एकेकाळीं आपल्याला अतिपरिचित करून दिलेल्या बेहेस्त शब्दाची व्युत्पत्ति वसिष्ठ या विशेषणापासूनच झाली आहे. वसिष्ठ शब्दाचें वहिश्ट असें रूपांतर होऊन पुढें त्यापासूनच स्वर्गवाचक बेहेश्त शब्द उद्भवला आहे. तेव्हां विशेषणरूपी वसिष्ठाची प्रतिष्ठा इथें उपयोगीं पडण्याजोगी असली तर ती इराणांत हिंदुस्थानाहून कमी नव्हती, इतकें आपल्याला निःशंकपणें म्हणतां येईल.

इथें सांगण्याजोगी मौजेची गोष्ट ही आहे कीं वसिष्ठांपैकीं ज्यांनीं आपल्या ब्रह्मपदाचा लोभ सोडला, त्यांना अवेस्त्यांत आदरपूर्वक अभिवंदन केलेलें आढळतें. अवेस्त्यांतील फर्वर्दीन यश्त या प्रकरणांत (१३-२६-१११) पुढील उल्लेख आढळतो; 'The Fravasi of ctaota – vahista, the pure, praise we'. या वाक्यांतील श्ताओता वहिस्ट हा शब्द स्तोता वसिष्ठ या संस्कृत शब्दाप्रीत्यर्थच वापरला आहे, हें उघड आहे. यांतील स्तोताहि ब्रह्मा या जरथुस्त्री पंथांत बहिष्कृत असलेल्या शब्दाकरितां योजला आहे, हें स्पष्टच दिसतें. अवेस्त्यांतील या एका वाक्यावरून वसिष्ठांचें इराणांतील अस्तित्व आणि त्यांच्या प्रतिष्ठेविषयीं जरथुस्त्री जनांना वाटणारा मत्सर यांवर उत्कृष्ट प्रकाश पडतो.

ब्रह्मा हें पद वासिष्ठांनाच मिळण्याचें मूळ कारण म्हणजे त्यांच्या कुळांत वेदांचें संकलन प्रथमपासूनच चालूं होतें, हें होय. वेदांतील वसिष्ठाचा पणतू व्यास याला वेदव्यास म्हणतात, हें सर्वांना ठाऊक आहे. व्यासानें वेदांची व्यवस्था लाविली म्हणून त्याला ही संज्ञा प्राप्त झाली, अशी सार्वत्रिक समजूत आहे. पण वेदशेरक हें वसिष्ठकुलांतील एका गोत्रकार गणाचें नांव आहे. व्यासाच्या शिष्यपरंपरेंत ऋक्शाखेंत वेदमित्र आणि सामशाखेंत वेदवृन्द्ध अशीं नांवें आढळतात. यावरून हें व्यासाचें कुलनाम असण्याची शक्यता प्रस्थापित होते. प्राचीन पारशी परंपरांतूनहि या कल्पनेला पाठिंबा मिळतो. जॅक्सनकृत जरथुस्त्रचरित्रांत पुढील माहिती आढळते. 'Zartusht at the bidding of Auharmazda next visits a Karap, one vedvoisht by name whom God has blessed with this world's goods. He demands from the Karap a hundred youths, maidens and teams of four horses, as a gift for the Almighty. An arrogant rebuff greets the prophet of the Lord and he flees for refuge to Auharmazda and

receives from him the comforting assurance of the fearful punishment by death eternal which shall be summarily meted out to the proud offender for his misdeed.' म्हणजे अहुरमझ्दाच्या सांगण्यावरून जरथुस्त्रानें वेद्वोइश्ट (अर्थात् वेद्वसिष्ठ) नांवाच्या कुपप्रांतीय श्रीमंत व्यक्तीकडे जाऊन त्याच्याजवळ शंभर कुमार, कुमारी, चार चार घोड्यांच्या चौकड्या इत्यादि धन अहुरमझ्दाच्या नांवानें मागितलें आणि त्यानें तें स्वाभाविकपणेंच द्यावयाचें नाकारल्यावर जरथुस्त्रानें आपल्या देवाकडे गाऱ्हाणें नेलें असतां त्या देवानें आपल्या प्रेषिताचा अपमान करणाऱ्याला लगेच अनंतकालपर्यंत नरकाचा आस्वाद घ्यायला धाडण्याचें आश्वासन दिलें. या अपूर्व माहितीवरून व्यक्त होणाऱ्या जरथुस्त्र आणि अहुरमझ्द यांच्या मनोवृत्तीसंबंधीं कांहींच लिहिण्याची आवश्यकता दिसत नाहीं. या माहितीवरून ऐतिहासिकदृष्ट्या असें अनुमान निघतें कीं जरथुस्त्राच्या त्या अपमानाबद्दल वेदवसिष्ठावर लौकरच कांहीं तरी भयानक अत्याचार घडला असला पाहिजे आणि त्या अत्याचाराची प्रतिक्रिया म्हणूनच जरथुस्त्राच्या उतार वयांत वसिष्ठांनीं त्याच्यावर सूड उगविला असावा. त्यामुळेंच आपण जरूथाला मारल्याची घोषणा करण्याचें साहस वसिष्ठांना करतां आलें. बहुधा वसिष्ठाचे शतपुत्र नष्ट झाल्याची जी कथा आपल्याकडे प्रचलित आहे, तिच्याशीं या प्रकरणाचा संबंध असावा. जरथुस्त्रानें वसिष्ठापाशीं शंभर कुमार मागितल्याचा स्पष्ट उल्लेख वरील उताऱ्यांत आहेच.

वसिष्ठमंडलांतील पहिल्या सूक्तांतच जरूथाला अग्नीनें जाळल्याचा उल्लेख केल्यानंतर वसिष्ठानें अग्नीची प्रार्थना केली आहे.

मा शूने अग्ने नि षदाम नृणां माऽशेषसोऽवीरता परि त्वा ।
प्रजावतीषु दुर्यासु दुर्य ॥ ११ ॥

'हे अग्ने, आम्हांला शून्य गृहांत रहावयाला न लागो, पुत्रहीन गृहांत किंवा अवीरपुत्र असलेल्या गृहांत राहणें भाग न पडो. परक्यांच्या घरांत राहणें आमच्या दैवीं न येवो. उत्कृष्ट संतति असलेल्या सदनीं राहण्याचें भाग्य आम्हांला लाभूं दे.' यापुढें चौथ्या सूक्तांतहि 'न शेषो अग्ने अन्यजातमस्ति अचेतानस्य मा पथो वि दुक्षः' म्हणजे परक्यांचीं अपत्यें हीं कधींच आपलीं होऊं शकत नाहींत, याकरितां अज्ञ जनांनीं अपत्यप्राप्तीकरितां केलेल्या उपायांचा उपहास करूं नका; अशी संकोचयुक्त विनंति केली आहे. या विनंतीवरून मंत्रकाराचे पुत्र नष्ट झाले होते, पण विश्वामित्राप्रमाणें दत्तक पुत्र घेण्याची त्याची सिद्धता नव्हती, इतपत अनुमानें काढतां येतील. या न्यायसंगत अनुमानांच्या पलीकडे जाऊन सौ. इरावतीबाईंनीं लिहिलें आहे कीं वसिष्ठानें आपल्या सुनेच्या पोटीं संतति निर्माण केली होती आणि त्या पापाबद्दल अग्नीजवळ या ऋचेंत त्यानें क्षमा मागितली आहे. या ऋचेंतील अचेतानस्य हा शब्द वृद्धापकाळीं विवाह किंवा नवससायास यांच्यासारख्या अचरटपणाच्या कृती करणाऱ्यांना उद्देशून वापरला आहे. स्नुषागमनासारखीं पापें करणाऱ्यांना उद्देशून वापरलेला नाहीं, इतकेंच उत्तर त्यांच्या तर्कटाला पुरें आहे. अन्यक्षेत्रीं उत्पन्न केलेली संततिहि अन्यजात होते, इतपत व्यवहारज्ञान वसिष्ठांना नक्की होतें.

वेदवसिष्ठाच्या संततीप्रमाणेंच स्वतः त्याच्यावरहि प्राणसंकट ओढवलें होतें, हें त्याच मंडलांतील ८६ व्या सूक्तावरून स्पष्ट आहे. 'किमाग आस वरुण ज्येष्ठं यत्स्तोतारं जिघांससि सखायम्' म्हणजे 'हे वरुणा, माझ्याकडून असें कोणतें महापातक घडलें आहे कीं ज्यामुळें तूं माझ्यासारख्या सख्याला ठार मारण्याला प्रवृत्त व्हावेंस' याच्या आधींच्या ऋचेंत वसिष्ठाला कवींनीं (कविकुळांतील व्यक्तींनीं) तुझ्यावर वरुण कोपला आहे, असें सांगितल्याचा उल्लेख आला आहे. 'समानम् इन्मे कवयः चित् आहुः अयं ह तुभ्यं वरुणो हृणीते.'

इराणी परंपरेप्रमाणें वरुण हें अहुरमझ्दाचें एक नांव आहे, हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे जॅक्सनच्या जरथुस्त्रचरित्रांतील परंपरा आणि वसिष्ठ मंडलांतील सूक्तें यांची परस्परपूरकता आणि एकवाक्यता वाचकांच्या लक्ष्यांत येईल. त्याच मंडलांतील ८८ व्या सूक्तावरून वसिष्ठानें धर्मत्याग करावा, यासाठीं त्याला प्रलोभन दाखविलें होतें, असें अनुमान काढतां येतें.

मा त एनस्वन्तो यक्षिन्भुजेम यन्धि ष्मा विप्रः स्तवते वरूथम् ॥

म्हणजे 'तुझ्या संबंधीं पाप करून (अर्थात् तुझ्या उपासनेसंबंधीं पाप करून) भोग भोगणें आमच्या हातून न घडो; याकरितां हे ज्ञानमया, तूं माझी ढाल हो.' जरथुस्त्रानें वसिष्ठाचा द्वेष करण्याचें एक महत्त्वाचें कारण म्हणजे वसिष्ठाप्रमाणें तोहि स्वतःला अहुरमझ्दाचा अर्थात् वरुणाचा पुत्र म्हणवीत असे. ही माहिती प्लेटोच्या नांवावर मोडणाऱ्या अल्किबियाडिस या ग्रीक ग्रंथांत आढळते. वसिष्ठ स्वतःला वरुणाचा पुत्र म्हणवीत असल्याचे उल्लेख त्याच्या सूक्तांतून अनेक ठिकाणीं आले आहेत. हे दोघेहि वरुणाचे पुत्र असले तर नक्की ते एकमेकांचे सावत्रभाऊ असले पाहिजेत! त्यावांचून कांहीं त्यांच्यांत इतका सापत्नभाव उद्भवला नसता!

जरथुस्त्रचरित्रांतील वेदवसिष्ठविषयक परंपरेशीं वसिष्ठसूक्तांचा किती मेळ बसतो, हें आतांपर्यंत दाखविलें. यापुढें स्वतः जरथुस्त्राच्या गाथांतून आढळणारे वसिष्ठविषयक संदर्भ वाचकांच्या पुढें मांडले पाहिजेत. अवेस्त्यांतील ३२ व्या यस्नांत जरथुस्त्रानें आपला एक प्रतिपक्षी गेरेझा याच्यावर शस्त्र उचललें आहे. हा गेरेझा कोण याचा अजून अवेस्त्याच्या अभ्यासकांना उलगडा झालेला नाहीं. डॉ. हौ यांनीं तो गृत्समद असावा, अशी कल्पना केली आहे. पण ती कल्पना इतर कोणालाहि पटलेली नाहीं. माझ्या मतें जरथुस्त्राच्या गाथांतील गेरेझा हा [illegible] शब्दाचा अपभ्रंश

आहे. 'व'चा अपभ्रंश ग करण्याची प्राचीन इराण्यांची खोडी सुप्रसिद्ध आहे. 'बवयोरभेदः' या नियमाप्रमाणें ब्रह्मा शब्दांतील 'ब'चाहि ग होऊन गेरेह्मा शब्द सिद्ध होतो. गेरेह्मा शब्दाची ही परंपरा लक्ष्यांत घेतली म्हणजे जरथुस्त्राच्या काळीं ब्रह्मपदाची प्रतिष्ठा भोगणाऱ्या वासिष्ठांना उद्देशूनच त्यानें तो शब्द योजला आहे, असें म्हणावें लागतें.

या क्षथ्रा गेरेह्मा हीषसत्
अचिश्तह्या देमाने मनंघ्रहा ॥ (३२-१३)

ज्याचें चित्त ठिकाणावर नाहीं, असा गेरेह्मा जो धर्म सांगतो; असा या वचनाचा सारांश आहे. यांतील अचिश्तह्या हा शब्द वसिष्ठ सूक्तांतून वर उतरून घेतलेल्या अचेतानस्य या शब्दाशीं अतिशय सदृश आहे. संततीचा ध्यास लागलेल्या जनांना उद्देशून (त्यांत कदाचित् स्वंतः वसिष्ठाचाहि समावेश होत असेल.) वसिष्ठानें अचेतानस्य हा शब्द वापरला होता. पण वसिष्ठाच्या प्रतिपक्ष्यांनीं तोच नेमका उचलून त्याला वैशिष्ट्यपूर्ण विशेषणाप्रमाणें चिकटवून दिला असल्यास नवल नाहीं. असा प्रकार नेहमीच घडतो. कांहीं वर्षांपूर्वी इथल्या एका पुढाऱ्यांनीं आपलें स्वतःचें अ आणि ह यांपासून प्रारंभ होणाऱ्या विशेषणांनीं वर्णन केलें, त्यामुळें त्यांचे प्रतिपक्षीहि त्यांना त्याच विशेषणांनीं संबोधूं लागले. तशांतलाच हा प्रकार आहे. वसिष्ठ स्वतःला देवाचा सखा म्हणवून घेत असे, हें वर आलेंच आहे. त्याला उद्देशून जरथुस्त्रानें त्याच गाथेंत म्हटलें आहे.

यात यूश्वा फ्रमीमथा
या मष्या अचिश्ता दन्तो
वक्षेन्ते दएवो–जूश्ता ॥

'असा कांहीं विचित्र काळ आला आहे कीं ज्यांचें चित्त थाऱ्यावर नाहीं अशांनासुद्धा देवाचे लाडके मानतात,' हे किंवा असलेच

इतर टोमणेहि जरथुस्त्रानें वसिष्ठालाच उद्देशून दिले आहेत, असें वरील माहितीवरून वाटतें. वरुणाचें एक सुप्रसिद्ध नांव प्रचेतस् आहे, हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे जरथुस्त्राच्या या टोमण्यांचें स्वारस्य नीट कळून येईल.

जरथुस्त्री धर्मक्रांति वसिष्ठमंडलांतील सूक्तांशीं समकालीनच असावी, असा आभिप्राय 'रिलीजन ऑफ दि वेदाज्' या ग्रंथाचे कर्ते मि. ग्रिस्वॉल्ड यांनींहि प्रकट केला आहे. 'The seventh book of the Rigveda is specially connected with the worship of Varuna,. and it is possible that the priestly familly of the Vashishta's the authors of the seventh book maintained some connection with the mother country Bactria before and during the progress of the Zoroastrian reform.' (P. 147) वसिष्ठमंडल वाचल्यावर ऐतिहासिक दृष्टि असणाऱ्या अगदीं त्रयस्थ व्यक्तीचें मत काय होतें, तें या अवतरणावरून समजून येतें. पण अभ्यासकांच्या ठिकाणीं ती दृष्टि अभावानेंच वसत असली तर मग त्यांच्यापुढें प्रत्यक्ष वेदांचाहि निरुपाय झाल्यास नवल नाहीं.

वसिष्ठाप्रमाणेंच विश्वामित्राचेंहि जरथुस्त्री पंथाशीं वाकडें आलें होतें, अशी शंका येते. विश्वामित्रमंडलांतील ५३ व्या सूक्तांत 'विश्वामित्राय ददतो मघानि सहस्रसावे प्रतिरंत आयुः' असा आंगिरसभोजादींना उद्देशून उल्लेख आला आहे. याचा अर्थ माझ्या मतें 'या सहस्रवार्षिक सत्राच्या प्रसंगीं भोज, आंगिरसप्रभृति जन विश्वामित्राकरितां मघांना जिंकून त्याचें आयुष्य वाढवोत,' असा असावा. जरथुस्त्राच्या गाथांतूनहि त्याच्या पंथाला मघ या नांवानें संबोधलें आहे. अथर्ववेदाच्या पांचव्या अध्यायांतील ११ व्या सूक्तांतून 'न कामेन पुनः मघो भवामि' किंवा 'त्वं हि अंग वरुण ब्रवीषि पुनः मघेषु अवद्यानि भूरि' यांसारखे मघांसंबंधीं तिरस्कारपूर्ण उद्गार काढलेले आढळतात. या वचनांच्या आधारानें विश्वामित्राच्या वरील

वचनांतल्या मघ शब्दाचा अर्थ जरथुस्त्राचे अनुयायी करणें अयुक्त होणार नाहीं.

अथर्ववेदाचा इथें उल्लेख आलाच आहे, तर त्यावरूनहि वसिष्ठाचा इराणशीं असलेला निकट संबंध कसा व्यक्त होतो, याचें एक मनोरंजक उदाहरण येथें सांगावेंसें वाटतें. अथर्ववेदांतल्या पहिल्या कांडांत वसिष्ठकृत ‘ अभीवर्तमणि ’ नांवाचें एक सूक्त आहे. अभीवर्तेन मणिना येनेन्द्रो अभिवावृधे । तेनास्मान् ब्रह्मणस्पते ऽभि राष्ट्राय वर्धय ॥ अभीवर्तो अभिभवः सपत्नक्षयणो मणिः । राष्ट्राय मह्य बध्यतां सपत्नेभ्यः पराभुवे ॥ या दोन अनुष्टुपांवरून त्या सूक्ताचा विषय स्पष्ट होतच आहे. अभीवर्त मण्यामुळें अभ्यावर्ती चायमानाला विजय मिळतात अशी समजूत झाल्यामुळेंच बहुधा वसिष्ठानें आपल्या साऱ्या राष्ट्राला तो मणि बांधून त्याला अजिंक्य करून ठेवलें ! अभीवर्त नांवाचा पार्थव चायमानाची राजधानी जी अबीवर्द तिच्याशीं संबंध असला पाहिजे, हें उघड आहे. विजयप्राप्तीप्रीत्यर्थ विशिष्ट मणि वापरण्याचे उल्लेख अवेस्त्यांत आले आहेत. उदाहरणार्थ, मी सिगुर कुळांतील रत्न: वापरीत असल्यानें माझा पराजय होणें शक्य नाहीं, असा एक उल्लेख त्यांत आहे.

वसिष्ठांच्या संबंधींचा आणखी एक संदर्भ प्रत्यक्ष अवेस्ता ग्रंथांत आढळतो, असें वाटतें. त्याचा विचार करण्याकरितां त्या ग्रंथांतील उतारा उतरून घेणें भाग आहे. मूळ अवेस्ता मला उपलब्ध नसल्यानें फोन फ्रिट्झ वोल्फ यांच्या जर्मन भाषांतराच्या २४५ पानावरील उतारा ( यस्त १६–१०५ ) उध्दृत करीत आहे.

‘Die Fravasay des asaglaubigen Manthravaka, ( sohns ) des saimuzi, des Meisters der (priester) schule, des Meisters der ( priester ) Zunft, verehren wir, der am meisten niederschlug die uberaus boesen, dem Asaglauben feindlichen Irrlehrer, ( die ihre ). Gesaenge schreiend vortragen ), ( die ) Keinen Ahu

(und) Ratav (haben), die greulichen, '(die) die Fravasy's erzurnt haben um der von Asaglaubigen veranlassten Anfeindung zu widerstehen.'

या उताऱ्यावरून असें समजतें कीं पूर्वीं साइमुझी कुळांत मांथ्रवाक नांवाचा धर्मप्रसारक होऊन गेला, त्याला इराणी लोक जरथुस्त्राच्या पहिल्या शिष्याहूनहि अधिक मान देतात. कारण त्यानें जरथुस्त्री धर्माला विरोध करणाऱ्या आणि आपलीं प्रार्थनागीतें ओरडून म्हणणाऱ्या दुष्ट नीच, अमानुष अशा विधर्मी उपदेशकांचा निःपात केला. या मांथ्रवाकानेंहि आपली धर्मनिष्ठा वसिष्ठकुळाचा घात करूनच व्यक्त केली असावी, अशी शंका येते. आपल्या प्रार्थना बेंबीच्या देठापासून ओरडून म्हणण्याबद्दल वसिष्ठांची प्रसिद्धि त्यांनीं स्वतःच करून ठेवली आहे. '**यत् शक्करीषु बृहता रवेण इंद्रे शुष्ममदधात वसिष्ठाः**' या सप्तममंडलांतील ३३ व्या सूक्तांतल्या स्वकृत वर्णनानंतर मांथ्रवाकाचा विशेष कटाक्ष कोणावर होता, हें कोणालाहि सहज कळण्याजोगें आहे. विशेषतः आपल्या प्रतिपक्ष्यांना दुष्ट, नीच, अमानुष इत्यादि विशेषणें मांथ्रवाक लावीत होता आणि नेमक्या याच आरोपांना वसिष्ठानें आपल्या मंडलाच्या अंतीं अत्यंत प्रखर भाषेंत उत्तर दिलें आहे. रक्षोघ्नसूक्ताचा सारा रोख जरथुस्त्री पंथाच्या अनुयायांवर आहे, याविषयीं मुळींच शंका नाहीं.

**उलूकयातुं शुशुलूकयातुं जहि श्वयातुं उत कोकयातुम् ।**
**सुपर्णयातुं उत गृध्रयातुं दृषदा इव प्र मृण रक्ष इंद्र: ॥** (७-१०४-२२)

या ऋचेंत घुबड, कुत्रा, गरुड, गिधाड इत्यादींची जादू करणाऱ्यांना चिरडून टाकण्याची विनंति वसिष्ठ इंद्राला करीत आहे. या जादूंपैकीं सुपर्णयातु कशी करावी, याचें विवेचन अवेस्त्याच्या चौदाव्या यस्तांत आलें आहे. या यस्तांत जरथुस्त्र अहुरमझ्दाला विचारतो कीं देवा, लोकांनीं माझ्याशीं शत्रुत्व केलें तर मी आत्मसंरक्षणाकरितां

कोणता उपाय योजावा ? या प्रश्नाला अहुरमझ्दानें उत्तर दिलें ' भक्ता, पक्षिराजाचे दोन मोठे पंख तूं आपल्याजवळ बाळगीत जा आणि शत्रूचें भय उत्पन्न झाल्यास त्यांतला एक पंख आपल्या देहावरून फिरीव आणि दुसरा पंख शत्रूच्या दिशेला फडफडावून त्याला दूर ठेव. हे पंख बाळगणाऱ्याला कोणताहि शत्रू मारूं शकत नाहीं, आपण मात्र आपला पंख फेकून एका शत्रूला निश्चितपणें मारूं शकतो. या पंखानें सहस्रावधि किंवा शतावधि शत्रूंना मारतां येणार नाहीं. केवळ एकदाच एका व्यक्तीविरुद्ध याचा प्रयोग करतां येईल.' जणूं काय कर्णाची वासवी शक्तिच ती ! कर्णाच्या वासवी शक्तीची कल्पनाहि मूळ अवेस्त्यांतील कल्पनेवरूनच सुचली असेल आणि कर्णाच्या इराणीपणाचा तो एक पुरावाहि होऊं शकेल !

केवळ वसिष्ठांच्या पुरतेंच बोलावयाचें तर त्यांनीं दाशराज्ञयुद्धाला पूर्णपणें धर्मयुद्धाचें स्वरूप दिलें होतें, याविषयीं शंका नाहीं. सातव्या मंडलांतील ८३ व्या सूक्तांत वसिष्ठानें म्हटलें आहे.

दश राजानः समिताः अयज्यवः सुदासमिंद्रावरुणा न युयुधुः ।
सत्या नृणामद्मसदामुपस्तुतिर्देवा एषामभवन्देवहूतिषु ॥ ७ ॥

' अहो इंद्रवरुणहो, यज्ञ न करणारे दहा राजे एकत्र झाले तरी ते एकट्या सुदासाला जिंकूं शकले नाहींत. उलटपक्षीं यज्ञांमध्यें हवींचा अपव्यय करणाऱ्यांच्या प्रार्थना मात्र सफळ झाल्या.' १८ व्या सूक्तांतहि ' अर्धं वीरस्य शृतपामनिन्द्रं परा शर्धन्तं नुनुदे अभि क्षाम् ' म्हणजे ' इंद्रावर विश्वास न ठेवणारे आणि स्वतःच हवि खाणारे असे जे सुदासाचे शत्रू होते ' त्यांचा सपशेल पराजय झाल्याचें वर्णन आलें आहे. याच सूक्तांत थोडें आधीं सुदासाच्या शत्रूंत तुर्वश हा तेवढा यजनशील असल्यामुळें त्याला इंद्रानें वाचविल्याचा उल्लेख आला आहे.

जरथुस्त्र आणि वसिष्ठ यांना परस्परांविषयीं तिरस्कार वाटण्याचें आणखी एक कारण असें होतें कीं जरथुस्त्र हा तत्कालीन आर्यांना अभिनव असलेल्या कृषिसंस्कृतीचा पुरस्कर्ता होता आणि वसिष्ठ हा परंपरागत पशुपालसंस्कृतीचा भोक्ता होता. वसिष्ठांच्या सूक्तांमधील भाषासुद्धा पशुपालांची आहे. त्यांना गोधनाव्यतिरिक्त अन्य धन माहीत होतें कीं नाहीं, याची शंकाच वाटते. याच्या उलट जरथुस्त्राची स्थिति होती. पारशी धर्मग्रंथ सांगतात कीं जरथुस्त्र हा पहिला जमीन नांगरणारा शेतकरी होय. हें विधान अक्षरशः खरें नसलें तरी तो कृषीच्या पहिल्या पुरस्कर्त्यांपैकीं होता, याविषयीं शंका नाहीं. जरथुस्त्राची कृषीची आवड ही त्याला कदाचित् त्याचा गुरु जो बुर्झिन कुरु, त्याच्यापासून लाभली असावी. कुरु लोकांत कृषीचा प्रसार यापूर्वीच झाला होता आणि पुढें भारतवर्षांतहि तिचा प्रारंभ कुरु राजाच्या राजवटींतच झाला, असें कुरु राजाच्या आख्यानावरून दिसतें. त्या राजाचें तप हें जमीन नांगरण्याचेंच होतें. कुरूंसहच हिंदुस्थानांत आलेल्या नारायणीयोपाख्यानांतहि नारायणानें 'कृषामि मेदिनीं पार्थ भूत्वा कृष्णायसो हलः' असें स्वतःचें वर्णन केलें आहे. या नारायणाचें स्थान उत्तरकुरु हेंच होतें, हें महाभारताच्या जाणत्या वाचकांना सांगायला नकोच.

जरथुस्त्राचे अनुयायी आणि त्याचे प्रतिपक्षी यांच्यामधील मुख्य भेद हा त्यांच्या दिग्बोधामधील प्रभेद होता. जिओपॉलिटिक्सचा पितामह फ्रीडरिश राट्झेल यानें म्हटलें आहे.

'Every people has to be educated up from smaller to larger space-conceptions ; and the process has to be repeated again and again to prevent the people from sinking back into the old small space-conceptions. The decay of every state is the result of a declining space-conception.'

या दृष्टीनें विचार केला असतां असें वाटतें कीं जरथुस्त्राच्या काळीं पर्शुभारतीय आर्यांपैकीं अनेकांना त्या वेळेपर्यंत त्यांनीं केलेलें आक्रमण आणि भ्रमण पुरें झालें होतें आणि इतरांना भरतखंडासारखा विस्तृत देश आर्यमय करून टाकण्याचें महत्कार्य मनाला मोह घालीत असतांना स्वस्थ बसवत नव्हतें. या दुसऱ्या वर्गाची भावना शुनःशेपाच्या आख्यानांतील इंद्राच्या पांच गाथांतून अत्यंत सुस्पष्ट रीतीनें व्यक्त झाली आहे. याचकरितां जरथुस्त्राचे घरकोंबडे अनुयायी वृत्रहंत्याची उपासना करीत असतांनासुद्धा इंद्राचा मनःपूर्वक द्वेष करीत असत. 'चरैवेति चरैवेति' असा आग्रहपूर्वक उपदेश करणाऱ्या इंद्राच्या उपासनेचा भारतीयांनीं जोंपर्यंत त्याग केला नव्हता, तोंपर्यंत त्यांचा सतत उत्कर्षच होत गेला. इंद्राची उपासना टाकल्यापासूनच त्यांची अवनति होऊं लागली.

वसिष्ठ आणि जरथुस्त्र यांचे परस्परसंबंध विशद करतांना विषयांतर नको म्हणून वसिष्ठचरित्राविषयींच्या प्रचलित समजुतींचा समाचार घेतला नाहीं. पण तो या प्रकरणाच्या अंतीं तरी घेतलाच पाहिजे. नाहीं तर वेदव्यासांच्या परंपरेंतील पुराणग्रंथांवर विश्वास ठेवणारे विद्वद्वर्य प्रत्यक्ष वेदाच्या आधारानें लिहिलेल्या वसिष्ठचरित्राचा विचारसुद्धा करण्याला सिद्ध होणार नाहींत. पौराणिक परंपरांच्या सत्यासत्यतेची चिकित्सा करतांना नेहमी एक गोष्ट लक्ष्यांत ठेवावी लागते. ती ही कीं परंपरागत अशा एखाद्या दुर्ज्ञेय किंवा अज्ञेय नांवाच्या स्पष्टीकरणार्थ जेव्हां पुराणकर्ते एखादी कथा सांगतात, तेव्हां ती कथा सर्वस्वीं स्वकपोलकल्पित असते, पण ज्या नांवाच्या निमित्तानें ती कथा लिहिली जाते तें मात्र परंपरागत माहितीप्रमाणें यथार्थ असतें. वसिष्ठकथेंतील कल्माषपादाचें नांव अशाच प्रकारचें आहे. या राजानें शापजल आपल्या चरणावर टाकल्यामुळें तें जळून काळेठिक्कर पडलें, ही कथा पुराणकारांनीं मागाहून रचली आहे, हें उघड आहे.

कल्माषपादाच्या नांवापैकीं पहिल्या कल्माचा मला अद्यापि अर्थ कळलेला नाहीं. ( त्याचा आदारकलाम या बाबिलोनी आणि बौद्ध नांवाशीं संबंध दिसतो. ) पण त्याचा अंतिम भाग अस्पाद् म्हणजे घोडेखाऊ हा आहे, याविषयीं मुळींच शंका नाहीं. बेहिस्तूनच्या शिलालेखांत भाद तख्मस्पाद् असें एक नांव आढळतें. त्यावरून इराणांत अंतीं अस्पाद शब्द येणारीं नांवें प्रचलित होतीं, हें कळून येतें. स्वतः सूर्यवंशाच्या वंशावळींतच शशाद हें एका राजाचें नांव आढळतें. हें नांव त्यानें ससा खाऊनच मिळविलें होतें, अशी आख्यायिका पुराणांनीं सांगितली आहेच. तेव्हां कल्माषपादानें वसिष्ठाचे पुत्र खाल्ले असलेच तर ती घटना हिंदुस्थानाबाहेर झाली असण्याचा संभव बराच आहे. त्या घटनेशीं विश्वामित्राचा कांहींहि संबंध दिसत नाहीं.

वसिष्ठाचे पुत्र खरोखरीच खाल्ले गेले होते, अशी माहिती वैदिक परंपरेंत आढळत नाहीं. रक्षोघ्नसूक्ताविषयीं लिहितांना बृहद्देवता ग्रंथांत एवढाच उल्लेख आढळतो.

> ऋषिर्ददर्श रक्षोघ्नं पुत्रशोकपरिप्लुतः ।
> हते पुत्रशते क्रुद्धः सौदासैर्दुःखितस्तथा ॥

पण ही माहिती रक्षोघ्नसूक्तांतील माहितीशीं विसंगत दिसते. ‘ न वा उ सोमः वृजिनं हिनोति न क्षत्रियं मिथुया धारयन्तम् ’ म्हणजे ‘ सोम कांहीं पापी पुरुषाला सोडणार नाहीं, किंवा क्षत्रिय नसतांना स्वतःला क्षत्रिय म्हणविणाऱ्याला सोडणार नाहीं. ’ या ऋचार्धावरून वसिष्ठाचा शत्रु क्षत्रिय नसतांना स्वतःला क्षत्रिय म्हणवीत होता, असें अनुमान निघतें. हें वर्णन विश्वामित्राला किंवा सुदासाच्या पुत्रांना लागूं पडत नाहीं. यापुढें ‘ प्र त उ त्ये पतयन्ति श्वयातव इंद्रं दिप्सन्ति दिप्सवोऽदाभ्यम् ’ या ऋचार्धांत कुत्र्याची जादू करणारे आणि इंद्राचा घात करूं इच्छिणारे असें जें वसिष्ठानें

आपल्या शत्रूंचें वर्णन केलें आहे तें तर केवळ जरथुस्त्राच्या अनुयायांनाच लागूं पडतें. तेव्हां कल्माषपाद या शब्दावरून आणि रक्षोघ्नसूक्ताच्या अंतर्गत पुराव्यावरून वसिष्ठाचे शत्रु इराणीच होते, असें सिद्ध होतें. वसिष्ठावर ओढवलेल्या आपदांत विश्वामित्राचा हात असल्याचें मला स्वतःला अद्यापि तरी आढळून आलें नाहीं.

येथें अशी एक शंका येते कीं इराणांत क्षत्रिय शब्दाचा अर्थ राजा असा होत असे; तर त्याच अर्थानें वसिष्ठानें क्षत्रिय शब्द वापरला नाहीं ना ? ही कल्पना खरी असल्यास असें अनुमान निघेल कीं इराणांतील एका वारसाच्या युद्धांत वसिष्ठ आणि जरथुस्त्र या उभयतांनीं परस्परविरोधी पक्षांची बाजू घेतली होती, त्यांत वसिष्ठाचा पक्ष पराभूत झाल्यानें त्याचा सर्वनाश झाला आणि त्याला हिंदुस्थानाकडे पळून यावें लागलें. वसिष्ठविषयक कथांतून पुष्कळदा वारसाच्या भानगडींचा संबंध येतो. त्यामुळें ही कल्पना खरी असण्याचा संभव बराच आहे. तसें असल्यास जरथुस्त्रानें वसिष्ठाकडे शंभर कुमार आणि घोडे कां मागितले असावेत, याचें कारणहि नीट कळतें आणि जरथुस्त्र किंवा त्याचा आश्रयदाता विश्तास्प राजा यांच्यापैकीं कोणी नरभक्षक होते, असली कल्पनाहि करावी लागत नाहीं.

——: ० :——

# इराण, तुराण आणि हिंदुस्थान

जरथुश्त्री पंथाच्या उदयापूर्वीं इराण, तुराण आणि हिंदुस्थान यांचा वांशिक आणि धार्मिक दृष्टया अतिशय निकटचा संबंध होता, ही कल्पना सर्व इतिहासकारांना मान्य आहे. पण प्राचीन हिंदुस्थानाच्या इतिहासांतील कोडीं उलगडण्याकरितां इराणतुराणांच्याहि इतिहासभूगोलांचा उपयोग केला पाहिजे, इतपत जाणीव त्यांच्यापैकीं एकालाहि झालेली दिसत नाहीं. आपल्या ऐतिहासिक दृष्टीच्या अभावाचें इतकें सुस्पष्ट प्रदर्शन करणाऱ्यांचे इतिहास केवळ प्रदर्शनांत ठेवण्याच्या योग्यतेचे झाले असल्यास नवल नाहीं! हे उद्गार अगदीं उद्वेगातिरेकानेंच बाहेर पडले आहेत. अशी वस्तुस्थिति नसती तर मला या विषयाकडे वळावेंहि लागलें नसतें आणि त्याकरतां माझ्या उपयुक्ततावादी मित्रांच्या उपहासाला पात्रहि व्हावें लागलें नसतें.

प्रस्तुत विषयाच्या विवरणाला प्रारंभ करण्यापूर्वीं माझ्या कल्पना आणि या विषयावर लिहिणाऱ्या अधिकारी मानलेल्या विद्वानांच्या कल्पना यांच्यांतील आकाशपातालप्रभेद प्रथम व्यक्त करणें आवश्यक आहे. हा प्रभेद व्यक्त करण्याकरितां भांडारकरसंशोधन संस्थेच्या रौप्य-महोत्सव ग्रंथांतल्या प्रो. वेलणकरांच्या लेखांतील कांहीं वाक्यें उतरून घेतलीं तरीं पुरेशीं होतील.

'The word Gungu occurs once in Rigveda; but there it seems to be the name of a river-deity or some other kind of deity. In the former case Gungu may be regarded as the name of an actual river and the Gungus may be the people dwelling on the banks of this river.

But this practice of naming a people from the place of their habitation, particularly a river, is not much in evidence in the Rigveda.'

असले पूर्वग्रह निःशंकपणें व्यक्त करणाऱ्यांच्या लेखनांतून संशोधनाचा काय उजेड पडणार आहे, तें उघडच दिसत आहे. या मुंबईच्या पंडितांप्रमाणेंच इतरहि अधिकारी विद्वानांची समजूत आहे आणि या साऱ्या विद्वानांच्या ऋग्वेदाविषयींच्या अगाध अज्ञानाला तीच समजूत कारणीभूत झाली आहे.

वरील उताऱ्यांत प्रो. वेलणकरांनीं गुंगु हीं एखादी नदी असण्याची शक्यता मान्य केली आहे. तेव्हां या गुंगु नदीच्या शोधापासूनच अधिकारी विद्वानांच्या अज्ञानतिमिरनिरसनाला प्रारभ करणें सोईचें होईल. दुसऱ्या मंडलाच्या ३२ व्या सूक्तांत 'या गुंगुर्या सिनीवाली या राका या सरस्वती इंद्राणीमह्व ऊतये वरुणानीं स्वस्तये' असा गुंगूचा निर्देष आढळतो. या निर्देशावरून गुंगु नदीविषयीं मंत्रकारांना अभिमान आणि आपलेपणा वाटत होता, असें अनुमान काढल्यास तें अधिकारी विद्वानांना आक्षेपार्ह वाटणार नाहीं, अशी आशा आहे. या अनुमानाला दहाव्या मंडलांतील ४८ व्या सूक्तांतल्या एका ऋचेनें पुष्टि मिळते.

'अहं गुंगुभ्यो अतिथिग्वमिष्करं इषं न वृत्रतुरं विक्षु धारयम् ।
यत्पर्णयघ्न उंत वा करंजहे प्राहं महे वृत्रहत्ये अशुश्रवि ॥ ८ ॥

या ऋचेचें प्रो. वेलणकरांनींच पुढील भाषांतर केलें आहे.

'I brought Atithigva as a gift to the Gungus; I placed among their people that killer of their enemies (who became welcome to them) like food when I became famous in the great battle where Parnaya and Karanja were killed.'

या ऋचेवरून असें दिसतें कीं गुंगु लोकांवर पर्णय आणि करंज यांची स्वारी झाली असतां अतिथिग्वानें गुंगूंना सहाय करून पर्णयकरंजांना मारलें. येथें एक अप्रस्तुत वाद प्रो. वेलणकरांनींच उत्पन्न करून ठेवला असल्यानें त्याचा उल्लेख केल्यावांचून पुढें जातां येत नाहीं. ते म्हणतात कीं गुंगूंना सहाय करणारा अतिथिग्व स्वतःच गुंगु होता. पण ही त्यांची समजूत ऋग्वेदांतील माहितीच्या विरुद्ध आहे. ' त्वं करंजमुत पर्णयं वधीस्तेजिष्ठयातिथिग्वस्य वर्तनी ' म्हणजे ' अतिथिग्वाच्या तेजस्वी फेऱ्यांत तूं करंज आणि पर्णय यांचा निःपात केलास. ' या वचनावरून गुंगूंच्या देशांत शिरून त्यांना जीवनसंकटांत पाडणाऱ्या शत्रूंना अतिथिग्वानें पराठिकाणाहून येऊन मारलें, हें उघड असल्यानें त्याला गुंगु समजण्याचें कांहींच कारण नाहीं.

राष्ट्रकथामालेंतील इराणच्या इतिहासांत असा उल्लेख आढळतो कीं इराणी लोकांच्या वंशपरंपरागत शत्रूंची राजधानी गंग होती. हाच गंग शब्द अवेस्त्यांत कंध असा लिहिला जातो. याचेंच पुढें कंगदेझ असें परिवर्तन झालें. याच देशाला आणि तेथील नदीला सध्या कुंदुझ हें नांव प्राप्त झाल्याचें मानचित्रावरून कळतें. ही कुंदुझच ऋग्वेदांतील गुंगु नदी होय, हें त्या नांवाच्या परिवर्तनांची वरील परंपरा पाहून कोणालाहि पटण्याजोगें आहे. ज्यांना याहून अधिक विश्वसनीय माहिती हवी असेल त्यांनीं पारश्यांपैकीं ज्या घराण्याला आपण इंग्रजी अक्षरवाटिकेवरून कांगा म्हणतों त्या कंग कुळांतील कोणाहि सुसंस्कृत व्यक्तीची भेट घ्यावी. त्या भेटीनंतर त्या संशयात्म्यांचे संशय नष्ट होतील, अशी आशा आहे,

या कुंदुझ किंवा गुंगु देशाशीं भारतीयांचा अतिशय निकटचा संबंध होता, असें सिद्ध करणारा पुरावा अद्यापि उपलब्ध आहे. तो आतां अधिकारी विद्वानांच्या निदर्शनाला आणला पाहिजे. सध्याच्या कुंदुझ नगराच्या दक्षिणेला बागलाण नांवाची नदी आणि त्याच नांवाचा

प्रांतहि आहे. ही बागलाण नदी कुंदुझ नदीलाच मिळते. या माहितीचें महत्त्व जसें महाराष्ट्रियांच्या मनावर बिंबेल तसें इतरांच्या मनावर बिंबणें शक्य नाहीं. कारण महाराष्ट्रांतहि एक बागलाण प्रांत आहे आणि त्याचा इतिहासांतूनहि उल्लेख येत असल्यानें तो सर्वांना चांगला माहीत आहे. बागलाण नांव महाराष्ट्रांत कधींपासून प्रचलित झालें, हें मला माहीत नाहीं. पण तें मुसलमानांनीं आणलेलें नाहीं, असें निश्चितपणें सांगतां येतें. कारण महाराष्ट्राप्रमाणेंच सिमल्याच्या सन्निधहि बागलाणांची वसति आहे. या ठिकाणीं बागलाणांचें एक लहानसें राज्य असून आर्की ही त्याची राजधानी आहे, असें 'रुद्रक्षत्रिय प्रकाश' या हिंदी ग्रंथाच्या १५१ पानावरील माहितीवरून कळतें. या बागल क्षत्रियांना वागली किंवा वगलाना अशीहि संज्ञा आहे. गुजराथेंतील शेवटचा स्वतंत्र हिंदु राजा करण वाघेला या नांवानेंच प्रसिद्ध आहे. महाराष्ट्रांतील बागल घराण्याचें नांवहि अनेकांनीं ऐकलें असेल. बुंदेलखंडांत एक बघेलखंडहि आहे. त्याचाहि अफगाणिस्थानांतील बागलाणाशीं संबंध असूं शकेल. या प्रश्नासंबंधीं अजून बरीच माहिती मिळवितां येण्याजोगी आहे. पण बागलाण आणि हिंदुस्थान यांचे निकट संबंध सिद्ध करण्याला वरील पुरावा पुरेसा होईल अशा समजुतीमुळें तो उद्योग आतांच करीत नाहीं.

गुंगु नदीच्या दक्षिणेला हेल्मुंद नांवाची नदी आहे. हीच अवेस्ता ग्रंथांतील सरस्वती होय. या नदीचा उल्लेख सरस्वतीच्या अपभ्रष्ट नांवानें ग्रीक ग्रंथकारांनीं वारंवार केला असल्यानें तिच्याविषयीं कोणालाहि संशय उरलेला नाहीं. अफगाणिस्थानांतील घोरी प्रांतांतच पूर्वेकडून वहात येऊन गुंगु नदीला मिळणारी इंदराब नांवाची नदी मानचित्रांत आढळते. हीच गुंगुसरस्वतीसह उल्लेखिलेली इंद्राणी असावी अशी शंका येते. पण तिचा प्राचीन इतिहासाशीं फारसा संबंध येत नसल्यानें या शंकेचें समाधान सध्यांच नाहीं झालें तरी चालेल. वर

उल्लेखिलेल्या घोरी प्रांताचाहि वैदिक इतिहासाशीं संबंध आहे. देवकीपुत्र कृष्णाला घोर आंगिरसानें उपदेश केल्याचा उल्लेख उपनिषदांतून आढळतो. अशा प्रसंगीं घोर शब्दाचें अधिकारी विद्वानांनीं निःसंकोचपणें भयंकर असें भाषांतर केलें आहे! घोर हें त्या आंगिरसाचें निवासस्थान असावें, अशी कल्पना वरील 'भयंकर' भाषांतरकारांपैकीं एकालाहि चुकून सुद्धां आली नाहीं. कदाचित् चक्रवर्ती राजगोपालाचार्यासारखीं नांवें त्यांनीं कधीं वाचलींच नसावींतच.

सहाव्या मंडलाच्या ६१ व्यां सूक्तांत सरस्वतीचा 'पारावतघ्नी' या नांवानें उल्लेख आला आहे. त्याच्या उलट आठव्या मंडलाच्या ३४ व्या सूक्तांत एका कण्वकुलोत्पन्नानें पारावतांकडून आपल्याला मिळालेल्या रथाचें वर्णन केलें आहे. ग्रीक लेखकांच्या आणि इराणी शिलालेखांच्या माहितिवरून असें कळतें कीं पारावत हा पर्शु लोकांतील एक टोळी होती. ग्रीकांनीं त्यांचा उल्लेख पाराएताकेनी या नांवानें केला आहे.

पारावतांचा घात करणारी सरस्वती इराण-अफगाणिस्थानांच्या सीमेवरील हामुन सरोवराला मिळते. या हामुन सरोवराच्या तीरावर आणि सरस्वतीच्या खोऱ्यांत पूर्वीं चरक नांवाचे लोक रहात असत. या चरकांचा इराणी शिलालेखांतून झरक या नांवानें उल्लेख आलेला आहे. तेव्हांच्या पूर्व इराणांतील भाषेंत झरक शब्दाचा सरोवराच्या तीरावर रहाणारे असा अर्थ होत असे. हा शब्द वेदांतील ऋचांतून आढळला नाहीं. पण कृष्ण यजुर्वेदाची परंपरा यांनींच टिकविली अशी माहिती मिळते. प्रस्तुत लेखक कृष्णयजुर्वेदी असल्यानें त्याला वैशंपायनाच्या या शिष्यांविषयीं कुतूहल आहेच, पण यजुर्वेदाची एक शाखा टिकविणाऱ्या चरकांचें मूलस्थान हा प्रत्येक वैदिक संशोधकाच्या कुतूहलाचा विषय होऊं शकेल. आयुर्वेदावरील आद्य ग्रंथकारहि चरक या नांवानेंच प्रसिद्ध आहे. संजीविनी विद्या असुरांच्या देशांतूनच मिळवावी लागली, याचें येथें स्मरण होतें.

आतां गुंगु आणि सरस्वती या सरिता ओलांडून आपल्याला प्रत्यक्ष इराणांत प्रवेश केला पाहिजे. कारण गुंगूंना उपद्रव देणारे करंज आणि पर्णय यांचा शोध तेथेंच लागणार आहे. गुंगूंचे शत्रू इराणी होते, हें त्या देशाच्या इतिहासाच्या आधारानें वर सांगितलेंच आहे. यांपैकीं करंजांच्या विषयीं मला इतिहासभूगोलांतून कांहींच माहिती मिळूं शकली नाहीं. पण पारश्यांच्या मध्यें कारंजिया हें कुळ प्रसिद्ध आहे. त्यांच्याकडे शोध केल्यास करंजांची अधिक माहिती मिळूं शकेल असें वाटतें. हा उद्योग मुंबईतील अधिकारी विद्वानांनीं करून पहावा. पर्णय ही पार्थियन लोकांची एक महत्त्वाची टोळी होती. इराणच्या इतिहासांत पर्णी या नांवानें तिचा उल्लेख वारंवार येतो. याच टोळीनें ख्रि. पू. १७५ च्या सुमारास ग्रीक लोकांना इराणांतून हांकून देऊन तेथें आपलें साम्राज्य स्थापिलें. येथें सांगण्याजोगी गोष्ट ही कीं तेव्हां गुंगूंच्या देशांतूनच ग्रकिांवर चढाई करून पर्णींनीं इराण जिंकला. पण ऋग्वेदाच्या काळीं ते तेथें अद्यापि प्रस्थापित झाले नव्हते.

दहाव्या मंडलाच्या ४९ व्या सूक्तांत 'अहं रन्धयं मृगयं श्रुतर्वणे' म्हणजे 'श्रुतर्वा राजाकरितां मी मृगयाचा कांटा काढला,' असा एक उल्लेख आला आहे. या ठिकाणचा श्रुतर्वा हा ऋग्वेदांत अन्यत्र येणारा आर्क्ष श्रुतर्वाच असला पाहिजे, हें उघड आहे. हे आर्क्ष लोक कास्पियन अथवा कश्यप समुद्राला मिळणाऱ्या आणि आराक्सेस या नांवानें ग्रीकांच्या ग्रंथांतून भेटणाऱ्या आर्क्ष नदीच्या तीरावर राहाणारे लोक होते. यांनीं ऋग्वेदकाळीं पूर्वेकडे मोठेंच आक्रमण चालविलें होतें. या आक्रमणांत त्यांनीं मृगयांना जिंकल्याची माहिती वरील वचनांत आली आहे. हे मृगय अर्वाचीन मर्व्ह प्रांताचे निवासी असावेत, असें वाटतें. इंग्रजी ज्ञानकोशांत मर्व्ह शब्दांची मर्गु, मर्गुस, मुर्घव अशीं प्राचीन स्वरूपें दिलीं आहेत. येथें पर्णयचें पर्णी हें रूप होतें तर मग मृगयचें मर्गु कां व्हावें, असा आक्षेप कोणी घेतल्यास त्यांना

इंग्रजींतील बट् आणि पुट् यांसारख्या सुप्रसिद्ध शब्दांची आठवण देणें शक्य आहे. तरी सुद्धा त्यांच्या आक्षेपाला अधिक प्रामाणिक उत्तर देण्याचा प्रयत्न करणेंच इष्ट होईल. मृगय शब्दाचें मूळचें स्वरूप मृगवु असावें, असें ऐतरेय ब्राह्मणांतील राम मार्गवेय या एका याज्ञिकाच्या नांवावरून दिसतें. या मृगवूचें रूपांतर मर्गू होणें अगदीं स्वाभाविक आहे. येथें, कास्पियन समुद्राकडील लोकांची टोळधाड इंद्रभक्तांच्या देशावर येत होती, याला पुरावा काय असाहि प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे. या संभाव्य आक्षेपाला उत्तर देण्याकारितां कर्नल सर थॉमस होल्डिच यांच्या 'हिंदुस्थानाचीं प्रवेशद्वारें' या ग्रंथाच्या २०१ पानावरील एक उतारा उतरून घेणें सोईचें होईल.

'The Bolous or Belous lived in the plains to the north right up to the foot of the mountains, and these are the people (according to Mr. Longworth Dames) who, hailling originally from the Caspian province, are the typical Baluch tribes people today.'

या उताऱ्यावरून केवळ कास्पियन प्रांतांतून भारतवर्षाकडे मानवी टोळधाडी येत होत्या, इतकेंच सिद्ध होत नसून इंद्राच्या अनेक शत्रूंपैकीं वलनामक शत्रु कोण होता, हेंहि कळून येतें. ही गोष्ट अगदीं खरी कीं सर्वस्वीं असामरिक वृत्तीच्या पंडितांनीं ऋग्वेदाचें अध्ययन आरंभिलें तर त्यांना युद्धविभागांतील अधिकाऱ्यांचीं पुस्तकें चाळण्याची बुद्धि थोडीच होणार! युद्धशास्त्राचा अभ्यास आणि प्राचीन इतिहासाचा अभ्यास यांचा अतिशय जिव्हाळ्याचा संबंध असतो. विशेषतः शांततेच्या दिवसांत संभाव्य युद्धक्षेत्रांची संपूर्ण माहिती मिळविण्याकरितां प्राचीन इतिहासाच्या संशोधनाच्या निमित्तानें सर्वत्र प्रवास करणें अत्यंत लाभदायक असतें. पण परतंत्र देशांतलि पुस्तकी पंडितांना या गोष्टी कळणार कोठून!

वर उल्लेखिलेला आर्क्ष श्रुतर्वा हा आनव म्हणजे अनुकुलोत्पन्न होता, असें ८–३–६३ या ऋचेवरून वाटतें 'आगन्म वृत्रहन्तमं ज्येष्ठमग्निमानवम् । यस्य श्रुतर्वा बृहन् आर्क्षो अनीक एधते' या ऋचेंत अग्नीला ज्या अर्थी आनव ही संज्ञा दिली आहे, त्याअर्थी त्या अग्नीचा उपासक श्रुतर्वाहि आनव होता हें उघडच आहे. प्राचीनकाळीं या आनवांची वसति मर्व्हच्या शेजारींच होती, असें श्री. सदानंद दीक्षित यांच्या 'Mother goddess' या पुस्तकांतील पुढील माहितिवरून समजते.

'The people of Anau in Turkestan near Askabad on the railway to Merv are known to be indebted directy or indirectly to either the Egyptians or the Mesapotamians, or both.'

म्हणजे अस्काबादपासून मर्व्हकडे जाणाऱ्या लोहपथाच्या मार्गावरच अनु नगर आहे. या माहितीवरून अनु नगरांतील आनवांनीं मर्व्हच्या मृगयांशीं प्रसंगविशेषीं युद्धें करणें किती स्वाभाविक आहे हें कळून येतें आणि श्री. सदानंदांच्याच मतांविरुद्ध जाऊन ऋग्वेदांतील वचनांच्या आधारानें तत्कालीन इतिहास जुळविण्याचा प्रयत्न मी कां करीत आहें, तेंहि स्पष्ट होतें.

मर्व्ह नगराच्या पूर्वेला आणि बल्ख नगराच्या ( अर्थात ब्राह्मण ग्रंथांतील बाल्हीक ) नगराच्या पश्चिमेला अंदखो किंवा अंदकुई नांवाचें नगर आणि नदी आहे. या अंधकांचा संबंध भारतांत वारंवार येतो, म्हणून त्यांच्या नांवाचा येथें उल्लेख करून ठेविला आहे. ऋग्वेदांत त्यांचें नांव आढळत नाहीं. याच्या उलट मर्व्हच्या दक्षिणेला हिरातच्या वाटेवर १६००० फूट उंचीच्या एका पर्वताजवळ बेद नांवाची जी एक लहानशी नदी आहे, तिच्या तीरावरील लोकांचा दाशराज्ञ युद्धाशीं प्रत्यक्ष संबंध येतो. ऋग्वेदांत त्यांना भेद या नांवानें संबोधिलें आहे. ऐतरेय

ब्राह्मणांत हिरण्यदन् वैद नांवाच्या याज्ञिकाचा उल्लेख येतो. तो बहुधा याच वेदांपैकीं असावा. वसिष्ठांच्या सूक्तांवरून या भेद किंवा वेद लोकांना तत्कालीन लोक फार भीत असावेत, असें दिसतें. सुदासानें भेदांचा संहार केल्यामुळें यमुना आणि तृत्सु यांना आनंद झाल्याचा उल्लेख वसिष्ठानें आपल्या विजयसूक्तांत केला आहे. या सूक्तांतले यमुना लोक मूळचे हिंदुस्थानाबाहेरील असावेत अशी माझी कल्पना आहे. यांनीं हिंदुस्थानांतील कालिंदी नदीच्या कांठीं वसति केल्यावर तिला यमुना हें नांव दिलें असावें. गंगेला जान्हवी नांवहि अशाच कारणास्तव प्राप्त झालें असावें. कदाचित् इराणांतील यमोपासकांनीं यमुनेच्या तीरावरील प्रांत व्यापला असावा. तसें असल्यास भेदांचें आणि त्यांचें प्रथमपासून वैर असणें अगदीं शक्य आहे.

मृगयांप्रमाणेंच चुमुरि आणि धुनि या दोन इंद्रशत्रूंचे उल्लेख वेदांत आढळतात. यांना इंद्रानें म्हणे तुर्वीति आणि दभीति यांच्याकरितां मारलें. यांपैकीं तुर्वीतीचें नांव अवेस्त्यांत आढळतें. तेव्हां चुमुरींचा शोधहि इराणांतच केला पाहिजे. याविषयीं इंग्रजी ज्ञानकोशांत अशी माहिती मिळते कीं बॅबिलोनियन लोक शकांना जिमिरि म्हणत असत, त्यांनाच इराणी लोकांनीं दिलेल्या नांवाची पाश्चात्यांनीं किमेरियन्स अशी विकृति केली आहे. फारसी ग्रंथांतून कैमूर हें नांव आढळतें. या सर्व नांवांनीं ओळखल्या जाणाऱ्या लोकांनाच मंत्रकारांनीं चुमुरि ही संज्ञा दिली होती, असें अनुमान काढण्याला अधिकारी विद्वानांचा विरोध नसेल, अशी आशा आहे. धुनींचा उल्लेख धुनी या नांवानें प्लिनीच्या ग्रंथांत आढळतो, हें ब्रून्होफेरनें दाखवून दिलें आहे.

आतां इंद्राचा एक प्रमुख शत्रु जो शंबर, त्याचा विचार केला पाहिजे. इराणच्या उत्तरेला आणि कास्पियन समुद्राच्या पूर्वेला सध्यां तुर्कोमान लोकांचा प्रांत आहे. या प्रांताच्या दक्षिणेला इराणचा गोकलान (जिथून काश्यपगोत्री गोमला कुरम येथें आलें आहे तो) प्रांत आहे.

यां दोन प्रांतांच्या समिवरच सुंबर आणि अत्रक या नद्यांचा संगम झाला आहे. यांपैकीं सुंबर नदीलाच प्राचीन काळीं शंबर म्हणत असावेत. तिच्या पैलतीरावर रहाणारे तुर्कोमान लोक रशियानें त्यांना जिंकेपर्यंत केवळ दस्यूंचाच व्यवसाय करीत असत. यामुळेंच शंबरांचा वेदांतून दस्यु म्हणूनच उल्लेख येतो. या शंबर नदीपासून सुमारें दीडशें मैलांवर मदन नांवाचें नगरहि इराणांत आहे, असें मानचित्रावरून दिसतें. शंबरानें मदनाला पळवून नेल्याची कथा ज्यांना स्मरत असेल, त्यांना तेवढ्याकरितां तरी शंबर आणि सुंवर हें समीकरण पटेल.

यावर कोणी अशी शंका काढतील कीं हा मदन म्हणजे कामदेव मदनच कशावरून ? त्यांना माझें उत्तर असें आहे कीं प्राचीन इराणी साम्राज्यांत नुसत्या मदन नगराचाच नव्हे, तर प्रत्यक्ष कामदेशाचाहि अंतर्भाव होत होता. अर्वाचीन अफगाणिस्थानांत काबूल नदीच्या उत्तरेला काफिरीस्थान नांवाचा प्रांत आहे. या प्रांतांत काम नांवाची नदी असून तिच्या तीरावरील प्रदेशाला कामदेश हेंच नांव मिळालें आहे. कर्नल सर थॉमस होल्डिच यांनीं या कामदेशियांच्या युद्धगीताचें एक कडवेंहि आपल्या 'हिंदुस्थानाचीं प्रवेशद्वारें' या ग्रंथांत भाषांतरित करून दिलें आहे. त्या कडव्यावरून असें दिसतें कीं कामदेशियांनीं आपला युद्धांतील पहिला विजय त्यांच्याच शेजारच्या मीनजनांवर मिळविला. त्यामुळेंच कदाचित् मदन हा मीनकेतन झाला असेल. या कामदेशियांची वसति हिंदुस्थानांतहि थोडीफार आढळून येते. भरतपूर संस्थानांतील काम परगणा बहुधा याच लोकांनीं वसविला असावा.

एवीं तेवीं मीनजनांचा उल्लेख येथें आलाच आहे. तेव्हां याच स्थळीं त्यांचाहि शोध करण्याचें काम उरकून टाकणें सोयीचें होईल. दाशराज्ञ युद्धांत मत्स्यांनीं भाग घेतल्याची माहिती पुढें यावयाचीच आहे. प्राचीन हिंदुस्थानाच्या भौगोलिक कोशांत श्री. नंदलाल दे यांनीं अशी माहिती सांगितली आहे कीं प्राचीन हिंदु लोक शकांना मीन

म्हणत असत, असा उल्लेख पेरिप्लस या ग्रंथांत आला आहे आणि आर्मिनियस व्हांबेरी या सुप्रसिद्ध हंगेरियन प्रवाश्याच्या म्हणण्याप्रमाणें अर्वाचीन उझबेग लोक शकांच्या मीन कुळापैकी आहेत. सध्यां उत्तर हिंदुस्थानांत दरवडे घालण्याबद्दल प्रसिद्ध असलेले मीन लोक हे शक, तुर्क, उझबेग यांच्या सारख्या आर्य कुलांचेच वंशधर आहेत. फादर हिरास आणि त्यांचे विद्यार्थी समजतात त्याप्रमाणें ते हिंदुस्थानाचे आदिवासी नव्हेत. द्रविड वंशाचे तर नव्हेतच नव्हेत. इंपीरियल गॅझेटीयरवरून असें समजतें कीं मीनांचा ज्या मेर टोळीशीं अतिशय निकट संबंध आहे, ती मेर टोळी मीड वंशाची आहे.

मदन नगरचा आणि काम देशाचा उल्लेख प्रस्तुत संशोधनांत अनपेक्षित रीत्या आढळला असल्यानें पूर्वीं कधीं मनांत न आलेल्या कल्पना आतां डोक्यांत घर करूं लागल्या आहेत. हे दोनहि उल्लेख प्राचीन इराणांतील कामाच्या प्रभावाचे आणि नीतीच्या अभावाचे निदर्शक आहेत. बहीणभावांच्या मध्यें कामवासना उत्पन्न करण्याचें प्रायश्चित्त म्हणून शंकरानें मदनदहन केलें, अशी शैव धर्मग्रंथांची परंपरा आहे. असले संबंध प्राचीन काळीं इराणांत कांही अंशीं तरी रूढ होते. असल्या संबंधांचा जरथुस्त्रानें आपल्या गाथांतून पुरस्कार केला आहे कीं नाहीं या विषयीं अवेस्त्याच्या अभ्यासकांतून अद्यापि मतभेद आहे. पण निदान जरथुस्त्राच्या घरकोंबड्या मनोवृत्तीशीं ही घटना सुसंगतच आहे, या विषयीं शंका नाहीं. ही कल्पना खरी असल्यास पर्शुभारतीय आर्यांमधील गृहकलहाचें एक निगूढ कारण एकाएकीं सुव्यक्त होतें, या विषयीं शंका नाहीं. अशा प्रकारच्या विकृत रूढि, मानव आणि त्यानें पाळलेले पशु यांच्यांत जेव्हां फारसें अंतर नव्हतें, अशा काळाच्या निदर्शक असतात. भगिनीविवाहाची रूढि हिंदुस्थानांतील आर्यांत प्रचलित असल्याची विश्वसनीय माहिती उपलब्ध होईपर्यंत तरी इराण हाच पर्शुभारतीय जनांचा आदिदेश मानावा लागतो. भारतीय आर्यांनीं

येथून बाहेर जाऊन जगभर उपनिवेश स्थापिले, असें समजणाऱ्या पावगीपंथी विद्वानांच्या करतांच वरील वाक्य लिहिलें आहे. इतरांना त्या ज्ञानाची आवश्यकता नसेलच.

मदनदहनाचें प्रकरण म्हणजे भगिनीविवाहाच्या प्रथेविरुद्ध झालेलें धर्मयुद्ध असा त्या काव्यमय प्रसंगाचा अर्थ केला म्हणजे कामाप्रमाणेंच हर हेंहि एक राष्ट्र मानावें लागतें आणि तसें मानण्याला इतिहास आणि भूगोल या उभयतांचाहि आधार आहे. काफिरीस्थानांतील कामदेशापासून सुमारें दोन अडीचशें मैल अंतरावर बदकशान या मध्यआशियांतील प्रांतांत शिव नांवाचा उपप्रांत आहे. याच शिव प्रांतांत राहाणाऱ्यांचा दाशराज्ञ युद्धाच्या प्रकरणांत शिवास या नांवानें उल्लेख येतो. तत्कालीन हर आणि काम यांचा कलह हा अर्थातच अर्वाचीन बदकशान आणि काफिरीस्थान यांच्यापुरता मर्यादित राहिला नव्हता; तो सर्व इराणभर पसरला होता. पण त्या कलहाचा इतिहास एका स्वतंत्र लेखाचा विषय होऊं शकेल. आतां आपल्या प्रस्तुत विषयाकडे वळावें, हें बरें.

वर उल्लेखिलेल्या शिव प्रांतापासून उत्तरेकडून दक्षिणेकडे जातांना वाटेंत क्रमानें रघ, डाँग, कतगण आणि अर्वाचीन काफिरीस्थान अथवा प्राचीन कामदेश लागतात. यांपैकीं रघ प्रांत हा रघुवंशाचा मूलदेश होय. रघुवंश आणि सूर्यवंश हे एकच होते असें संस्कृतज्ञ विद्वान मानीत असले तरी क्षत्रिय राजांचें मत तसें नाहीं. स्वर्गीय महाराजा श्रीरणजोरसिंहजू अजयगड यांनीं स्वरचित क्षत्रकुलवंशावलिमध्यें दिलेल्या सोळा सूर्यवंशी घराण्यांमध्यें सूर्यवंशी, रघुवंशी आणि दांगी यांचा स्वतंत्र उल्लेख केला आहे. या उल्लेखावरूनहि रघ आणि दांग अर्थात डाँग या प्रांतांशीं त्या घराण्यांचा संबंध असल्याचें उघड दिसत आहे. अपरिहार्य कारणांमुळें तो प्रांत सोडून हिंदुस्थानांत आल्यानंतर

रघुवंशानें येथें अमर कीर्ति मिळविली तशी कीर्ति डांगीं घराण्याच्या वांट्याला आली नसली तरी त्या कुळांतील क्षत्रिय घराणीं अद्यापि विद्यमान आहेत. या डाँग प्रांतांतील लोकांनींच बहुधा जव्हारनाशिककडील डाँगदेशाला आपल्या प्रांताचें नांव दिलें असावें. या एका नांवाकरतां आम्हां महाराष्ट्रियांना त्या प्रांताविषयीं कुतूहल वाटलें पाहिजे.

रघ आणि डाँग या दोनहि प्रांतांच्या दक्षिणेला मीनजन अथवा कोकचा नांवाची नदी आहे. हिंदुस्थान आणि बदकशान यांच्या सीमेवरील हिंदुकुश पर्वतांत मीनजन नांवाचा घाटहि आहे. तत्कालीन प्रांतिक कलहांमध्यें शिव प्रांतांतून वहाणारी शिव नदी आणि डाँग प्रांताच्या दक्षिण सीमेवरील मीनजन नदी या उभयतांच्या अंतर्वेदींत अडकलेले रघ आणि डाँग यांना परस्परांशीं सहकार्य करणें भागच होतें. याच कारणांमुळें शिव आणि मीनजन या दोनहि प्रांतांतील लोकांशीं त्यांचें वैर झालें होतें. यामुळें दाशराज्ञयुद्धांत रघुवंशांतील कुत्स आणि पुरुकुत्स यांनीं सुदासाच्या पक्षानें भाग घेतला तर शिवास आणि मत्स्यास यांच्या प्रमुखांनीं सुदासावर शस्त्र उचललें. डाँग लोकांनीं बहुधा रघूंचेंच अनुकरण आणि अनुसरण केलें असावें. त्यामुळेंच त्यांना दक्षिणेंतील डाँग देशाला आपलें नांव देण्याची संधि सांपडली.

आतां कतगणांचा तेवढा विचार करावयाचा राहिला. या प्रांतांतील निवासी सुदासाचे सहकारी असावेत अशी कल्पना करण्याला कांहीं आधार आहेत. विश्वामित्रमंडलांतील एकदोन सूक्तें कत या मंत्रद्रष्ट्याच्या नांवावर मोडतात. त्यावरून विश्वामित्राच्या कुलांत कतांचा समावेश होत होता, हें दिसून येतें.* कतगण प्रांत अर्वाचीन कुंदुझ अथवा

* विश्वामित्रकुलाला संपत्ति देण्याची कतानें १८ व्या सूक्तांत अमील विनंति केली आहे.

प्राचीन गुंगु प्रांताला अगदीं लागूनच आहे. कुंदुझ नदीकडून मीनजन नदीकडे जातांना वाटेंत वरसख नांवाची एक लहान नदी लागते. “ वर्धीदिंद्रो वराशिखस्य शेष: अभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन् । वृचीवतो यद्धरियूपीयायां हन् पूर्वे अर्धे भियसापरोदर्त् ॥ ” या ऋचेंत सांगितलेले वरशिख लोक हे या वरसख नदीच्या खोऱ्यांतील निवासीच होत. चायमान वराशिखांचा संहार करीत असतांना ज्या दैववातानें वृचीवंतांचा पराजय केला तो दैववात जन्हु म्हणजे विश्वामित्राच्याच कुलांतील असल्यानें त्याचा कतगण आणि कुंदुझ या भागांतील लढायांशीं निकटचा संबंध येणें साहजिकच आहे. ही सारी भौगोलिक परिस्थिति लक्ष्यांत घेतली म्हणजे दैववाताच्या कुळाशीं ज्याचें जवळचें नातें होतें अशा अतिथिग्वानें गुंगूंच्या सहायाकरितां करंजपर्णयांना कां जिंकलें याचें कारण समजतें. भूगोलाचे उपनेत्र लावल्यावांचून वेद समजून घेण्याचा प्रयत्न करणें म्हणजे आंधळयांच्या मालिकेंत आपणहि समाविष्ट होण्यासारखेंच आहे, हें आमच्या संस्कृतज्ज्ञांना जेव्हां उमगेल, तो वेदांचा सुदिन होय !

विश्वामित्राच्या कतगण प्रांताच्या आग्नेयेला सध्यांचा काफिरीस्थान अर्थात् तेव्हांचा काम देश आहे. विश्वामित्राला काम जिंकण्याला किती प्रयास पडले, हें सर्व सुबुद्ध वाचकांना पौराणिक कथांवरून किंवा खाडिलकरांच्या मेनकेवरून पुरतें माहीत झालें असल्यानें काम आणि विश्वामित्र यांच्या नैकट्याचा हा पुरावा पाहून लेखकाप्रमाणेंच त्यांचीहि करमणूक होईल, याविषयीं शंका नाहीं. * या काफिरीस्थानांत कुणार नांवाची दुसरी एक नदी आहे आणि तिसऱ्या मंडलांतील तिसाव्या सूक्तांत तिचा उल्लेख कुणारु या इंद्रशत्रूच्या मिषानें आला आहे—

* विश्वामित्र–कुलोत्पन्न गोत्रकारांत कामुकायन, कामलायन अशीं नांवेंहि आढळतात.

सहदानुं पुरुहूत क्षियन्तमहस्तमिंद्र संपिणक्कुणारुम्।
अभि वृत्रं वर्धमानं पियारुमपादमिन्द्र तवसा जघन्थ॥ ८॥

म्हणजे दानूंचें सहाय असलेल्या कुणारूचे इंद्रानें हात तोडले आणि वृत्राच्या आश्रयानें वाढणाऱ्या पियारूंचे पाय तोडले. या स्थळीं उल्लेखिलेल्या जनांपैकीं केवळ कुणारूंचाच शोध लागला आहे. कुणार नदी चित्रळ संस्थानांत उगम पावून काफिरीस्थामांतून अफगाणिस्थानांत जाऊन जलालाबादेच्या पूर्वेस काबूल नदीला मिळते. असो, सुदास आणि त्याचे सहकारी यांची माहिती एकत्रित करतांना पुन्हा एकदां या भागाकडे वळावेंच लागेल. तेव्हां सध्यां या भागाचा निरोप घेऊन इंद्राच्या अन्य शत्रूंकडे वळणें सोयीचें होईल.

इंद्राच्या शत्रूंत अर्बुद हेंहि एक नांव आढळतें. 'महान्तांचि-दर्बुदं नि क्रमीः' असा त्याच्याविषयीं उल्लेख आला आहे. हा अर्बुद म्हणजे अल्बुर्ज पर्वत होय. अल्बुर्ज यांतील पहिला अल् हें उपपद ठरवून येथल्या एका भारतविदित विद्वानांनीं अर्बुद=अल्बुर्ज या समीकरणावर आक्षेप घेतला. पण त्यांना माझें इतकेंच उत्तर आहे कीं लिओनेल लॉइडसारख्या प्रमाण मानलेल्या भूगोलशास्त्रज्ञांनींहि अल्बुर्ज हा एकच शब्द मानलेला आहे.

अर्बुद पर्वताप्रमाणेंच अर्बुद लोकांचाहि वेदांत स्वतंत्र उल्लेख आढळतो. उदाहरणार्थ :—

'अहन् वृत्रं ऋचीषमः और्णवाभं अहीशुवं। हिमेनाविध्यद अर्बुदम्।' (८-३२-२६) या ऋचेंत अर्बुदाला हिमानें मारल्याचा उल्लेख आला आहे, तो अर्थात् अर्बुदवासी जनांना हिमप्रलयानें अन्न मिळणें किंवा पर्वतांत दडून राहणें अशक्य झाल्यानें शत्रूंना शरण जावें लागलें, या घटनेला अनुलक्षूनच आला आहे. अर्बुद काद्रवेय नांवाच्या एका

ऋषीची कथा ऐतरेय ब्राह्मणांत आढळते. ( ६–१ ) काद्रवेय म्हणजे कद्रूचा पुत्र, एवढ्यावरूनच ऐतरेयाच्या कर्त्यांनें त्याला सर्प बनविलें आहे. अर्बुदाप्रमाणेंच कद्रू हाहि एक इराणांतील पर्वत आहे. अवेस्त्यांतील १९ व्या यस्ताच्या प्रारंभीं आलेल्या पर्वतनाममालेंत कद्रअस्प असें एक नांव येतें. ऐतरेय ब्राह्मणांत अशी माहिती आली आहे कीं 'प्रैते वदन्तु प्र वयं वदाम' इत्यादि सूक्त म्हणून सोम कुटण्याच्या वरवंट्याची स्तुति करण्याची पद्धति मूळची अर्बुदांची होती आणि ती त्यांनीं देवांना शिकविली. यांत विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं अशी स्तुति करणाऱ्या आधुनिक 'अर्बुदां'ची विषारी दृष्टि सोमवल्लीवर पडून ती दूषित होऊं नये याकरितां त्यांचे डोळे पागोट्यानें बांधावे- लागतात; म्हणजे अर्बुदांचें अनुकरण पूर्ण होतें. मस्तक, मुख आणि नासिका पूर्णपणें आच्छादून मगच उपासना करण्याची पद्धति सर्वस्वीं इराणी आहे. आपल्या इकडे इराणांतून आलेल्या सूर्यपूजेच्या विधींत मात्र ती प्रथा आढळते. एवढ्यावरून अर्बुदांचा देश आणि संस्कृति यांची पुरेशी कल्पना येईल, अशी आशा आहे.

अर्बुदांप्रमाणेंच पश्चिम इराणांत वास करणाऱ्या एका टोळीला असगर्त असें नांव होतें. या टोळीचा उल्लेख बेहिस्तूनच्या शिलालेखांत अशगर्त या नांवानें आला आहे. या नांवाचा ऋग्वेदाशीं संबंध येत नाहीं. पण त्या नांवावरून शुनःशेपाचा पिता अजीगर्त याचें स्मरण होतें. भारतांत त्रिगर्तांचा उल्लेख आढळतो. तेथें त्रिगर्तांनीं कुरूंच्या सहायानें आपले नित्य शत्रू जे मत्स्य, त्यांचें गोधन लुटलें आहे. त्रिगर्त या नांवावरून अशी शंका येते कीं अशगर्त (अश्वगर्त), अजीगर्त आणि मला माहीत नसलेली तिसरी एखादी गर्त टोळी मिळून त्रिगर्त बनले कीं काय ?

आतां सरते शेवटीं त्रिगर्तांना सहाय करणाऱ्या कुरूंचा शोध केला पाहिजे. बाल्हीक देशांत कौरव्य राजा प्रातिपीय राज्य करीत

असल्याचा उल्लेख शतपथ ब्राह्मणांत आला आहे. महाभारतामुळें अजरामर झालेले कुरु कॉकेशस प्रांतांतील कुरु नदीच्या खोऱ्यांतून हिंदुस्थानाकडे आले. हिंदुस्थानांत येऊन पोहोंचण्यापूर्वी वाटेंत त्यांनीं इराणांत आणि बाल्हीक देशांत राज्यें स्थापिलीं. प्राचीन काळीं इराणच्या दक्षिण भागांत पर्शु लोक राहात असत आणि उत्तरेकडील भागांत मद्र, कुरु, पार्थव इत्यादि कुलें वास करीत असत. या दोन भागांमधील पर्वताला अद्यापि कुरुकोह म्हणजे कुरूंचा पर्वत अशीच संज्ञा आहे. या भागाला प्राचीन काळीं कुरुक्षेत्र याच नांवानें ओळखीत असत, असें ग्रीक लेखकांच्या लेखांवरून डुंकेर या जर्मन इतिहासकारानें आपल्या प्राचीनकाळाच्या इतिहासांत लिंहिलें आहे. उर्वशीच्या शोधाप्रीत्यर्थ पुरूरव्यानें कुरुक्षेत्र पालथें घातलें, या शतपथांतील उल्लेखावरून भारतवर्षाबाहेर दुसरें एखादें कुरुक्षेत्र असलें पाहिजे, असें अनुमान मीहि केलें होतें;त्याचें स्थळ डुंकेरच्या इतिहासावरून निश्चितपणें कळून आलें आहे. इराणांत कांहीं काळ कुरु आणि त्यांचे निकटचे भाऊबंद आर्क्ष, या उभयतांनीं आपलें साम्राज्यहि प्रस्थापित केलें होतें. इराणाप्रमाणेंच बाल्हीक देशांतहि त्यांनीं राज्य स्थापिलें होतें. बाल्हीक प्रांतांत आर्यांनीं नवीन राज्य स्थापल्याचा काळ केनेडी नांवाच्या संशोधकानें ख्रिस्तपूर्व २२०० ते २१०० हा दिला आहे. (जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी १९०९, पानें १०९५ ते १११९).

शिवासांच्या संबंधीं एक महत्त्वाचा नवीन पुरावा उपलब्ध झाला आहे. बदकशान प्रांतांतील शिव प्रांताला लागून रोशन नांवाचा प्रांत आहे. या रोशन प्रांतांत आब इ पंज नदीच्या एका संगमावर किला वमर नांवाचें महत्त्वाचें ठाणें आहे. आश्विनीकुमारांनीं वम्राला सहाय केल्याचा उल्लेख पहिल्या मंडलाच्या ११२ व्या सूक्तांत आला आहे. दहाव्या

मंडलांतील ९९ वें सूक्त एका वम्राचेंच असून त्यांत त्यानें शिश्नदेवांचा इंद्राकडून विध्वंस झाल्याचा उल्लेख केला आहे. तेव्हां मानचित्रावरून जो प्रांत शिव म्हणून ओळखतां येतो, तो प्रांत खरोखरीच शैवांचा होता, असें वम्राच्या सूक्तांवरून निःसंदेहपणें म्हणतां येतें, आमचे अधिकारी विद्वान् आक्षेप घेतात, त्याप्रमाणें केवळ अक्षरसादृश्यावरून इतिहासरचनेचा हा उद्योग नसून ऋग्वेदाचें संशोधन अढळ पायावर उभारण्याचा हा प्रयत्न आहे, हें त्यांनाहि कळून येईल.

——:०:——

# चायमानाची भारतवर्षावर स्वारी

तूर्वयाणानें कुत्स आणि अतिथिग्व यांना, त्याप्रमाणेंच वध्र्यश्वानें दिवोदासाला पकडल्यानंतरहि सुदास आणि पुरुकुत्स यांनीं चायमानाला शरण न जातां आपलें स्वतंत्र अस्तित्व टिकविण्याचा प्रयत्न चालविल्यामुळें त्या पार्थव सम्राटाला भारतवर्षावर स्वारी करावी लागली. या स्वारीमुळें झालेल्या चायमान आणि सुदास यांच्या युद्धाचें वर्णन करण्यापूर्वी चायमानाच्या पक्षाला कोण कोण लोक मिळाले होते, त्यांची माहिती करून घेतली पाहिजे. सुदासावर स्वारी करण्यांत पृथु आणि पर्शु यांनीं पुढाकार घेतला होता, असें सातव्या मंडलांतील ८३ व्या सूक्तावरून वाटतें.

युवां नरा पश्यमानास आप्यं प्राचा गव्यंतः पृथुपर्शवो ययुः ।
दासा च वृत्रा हतमार्याणिच सुदासमिंद्रावरुणावसावतम् ।

म्हणजे पृथु आणि पर्शु यांनीं पूर्वेकडे स्वारी केली. या स्वारींत त्यांना दास, वृत्र, आर्य इत्यादींचेंहि सहाय मिळालें असूनसुद्धां त्या आपत्प्रसंगीं इंद्रवरुणांनीं सुदासाचें संरक्षण केलें. पृथुपर्शूंना तेव्हां आणखी किती लोकांचें सहाय मिळालें होतें, हें त्याच मंडलांतील १८ व्या सूक्तांत सांगितलें आहे.

पुरोळा इत्तुर्वशो यक्षुरासीद्राये मत्स्यासो निशिता अपीव ।
श्रुष्टिंचक्रुर्भृगवो द्रुह्यवश्च सखा सखायमतरद्विषूचोः ॥ ६ ॥
आ पक्थासो भलानसो भनंतालिनासो विषाणिनः शिवासः ।
आ यो ऽनयत्सधमा आर्यस्य गव्या तृत्सुभ्यो अजगन्युधानॄन् ॥ ७ ॥

या अवतरणांत सुदासाच्या शत्रूंमध्यें तुर्वशाचा जो उल्लेख आला आहे, त्याच्यासंबंधीं किंचित् विस्तारानें विवेचन करणें आवश्यक आहे. पहिल्या मंडलांतील ५४ व्या सूक्तांत 'त्वमाविथ नर्यं तुर्वशं यदुं त्वं तुर्वीतिं वय्यं शतक्रतो' असा उल्लेख आला आहे. या साऱ्या जनांमध्यें नर्यांचें स्थान तेवढें निश्चित आहे. नर्य ही मध्य आशियांतील सिरदर्या नदीला मिळणारी एक नदी आहे. तिच्या तीरावरील जनांना प्राचीनकाळीं नर्य संज्ञा होती. नर्य नदीपासून कांहीं अंतरावर अर्य नदी आहे आणि तिच्या तीरावरील जनांनाच ऋग्वेदांत अर्य या नांवानें संबोधिलें आहे. असीरियासीरिया, अमूरमूर इत्यादि अन्य द्वंद्वांप्रमाणेंच अर्य आणि नर्य हे परस्परांच्या शेजारीं रहात असत. त्यांच्यासहच तुर्वशांचा उल्लेख येतो, तेव्हां तेहि त्यांचे शेजारीच असले पाहिजेत. तुर्वश या नांवावरूनहि त्यांचा तुर म्हणजे तुराण या प्रांताशीं संबंध असल्याचें व्यक्त होतें. त्यामुळें तुर्वशांचें आणि चायमानाचें प्रथम वैरच होतें. तुर्वशांचा शंबरांशींहि सख्यसंबंध होता. नवव्या मंडलांतील ६१ व्या सूक्तांत दिवोदासानें शंबरांच्या बरोबरच तुर्वश आणि यदु यांना जिंकल्याचा उल्लेख आहे. यानंतर वराशिख, वृचीवंत आणि तुर्वश या सर्वांचा जेव्हां पराजय झाला, तेव्हां सृंजयानें तुर्वशाला धरून त्याला चायमानाचा अंकित बनविलें. यामुळें दाशराज्ञ युद्धांत ते चायमानाच्या पक्षानें लढत होते. पण सृंजयानें तुर्वशाला धरिलें, तेव्हां त्यानें त्याला युद्धापराधी म्हणून न वागवितां त्याच्याशीं सख्यसंबंधच जोडला होता, असें पुढील घटनांवरून दिसतें. यानंतर सृंजयांकडील यज्ञाला तुर्वश उपस्थित असल्याचे उल्लेख आहेत. दाशराज्ञ युद्धांतहि परुष्णी तीरावरील निर्वाणीच्या लढाईंत बहुधा सुदासाच्या सूचनेवरून ते सर्वांच्या आधीं पळून गेल्यामुळें वांचले. 'सखा सखायमतरद्विषूचोः' या वचनाच्या इतरांनीं केलेल्या अर्थावरूनच हें विधान केलें आहे. यदुतुर्वशांना अनुलक्षून ऋग्वेदांत ४-३०-१७ या स्थळीं 'अस्नातारा' हा शब्द वापरला आहे. या

शब्दाचे भारतीय विद्वानांनीं अनेक भयानक अर्थ केले आहेत. पण अवेस्त्यांत सोम धुणाऱ्या ऋत्विजांना 'आस्नातारा' ही संज्ञा लावितात आणि त्यावरून असें वाटतें कीं वेदांतील अस्नातारा शब्दाचा अर्थ बहुधा त्यासारखाच असावा. हा शब्द यदुतुर्वशांना लावितात, यावरून तेव्हां ब्राह्मणांचीं कर्तव्यें राजे लोकहि करीत, हें दिसून येतें.

तुर्वशांप्रमाणेंच मत्स्य लोकहि सुदासाच्या शत्रूंना मिळाले होते असें 'मत्स्यासो निशिता अपीव' या वचनावरून समजतें. द्रुह्यु आणि भृगु हे इराणीच असल्यानें ते कवि चायमानांच्या पक्षानें लढत होते, हें सांगावयाला नकोच.कवि आणि भृगु हीं एकाच कुळाचीं दोन भिन्न नामें आहेत, असें म्हटलें तरी चालण्याजोगें आहे. द्रुह्यूंचे उपाध्याय भृगु होते, अशी आपल्या देशांतील परंपरागत माहिती आहे. तेव्हां त्यांचा देश कोणता हें वेगळें सांगावयाला नकोच. त्यानंतरच्या ऋचेंत आलेल्या नांवांपैकीं पक्थास हा शब्द विशेषतः अटकेकडील अफगाणांना लाविला असावा, असें वाटतें. इराणांतील हखामणी राजांनीं जेव्हां सिंधु नदाची पहाणी केली, तेव्हां त्या पहाणीचा प्रारंभ पक्थांच्या देशांतील करपतुर नगरापासून झाला, असे तत्कालीन उल्लेख आहेत. ही पहाणी नौकांतून झाली असल्यानें तिचा प्रारंभ अटकेकडून होणें साहजिक आहे. भलानसांच्या संबंधीं प्रो. कीथ आणि श्री. नंदलाल दे या उभयतांनीं ते बोलनघाटाकडील प्रदेशांत रहात असावेत, असें मत व्यक्त केलें आहे, तें मला फारसें विश्वसनीय वाटत नाहीं. पण स्वतःला नवी कल्पना सुचेपर्यंत त्यांच्या मताचा उल्लेख करून ठेवणें भाग आहे. भलानसांना बोलनघाट दिला तर अलिनासांना खैबरघाट द्यावा लागेल. पण अलिनांची वसति मर्व्हच्या शेजारीं होती, असें ब्रुन्होफेरनें दाखवून दिलें आहे. या उभयतांच्या मानानें शिवासांचें स्थळ अधिक निश्चित आहे. मध्य आशियांतील बदक्शान प्रांतांत शिवास हा एक उपप्रांत आहे. हा प्रांत मत्स्य लोकांच्या मीनजन नदीच्या खोऱ्यांतील निवासासन्निधच असल्यानें त्या उभयतांनीं

हिंदुकूश पर्वताच्या मीनजन घाटांतूनच भारतवर्षांत उतरून सुदासावर चढाई केली असावी.

वरील सर्व नांवांपेक्षां विषाणिनांच्या संबंधीं विस्तारपूर्वक वर्णन करणें आवश्यक आहे. हा प्रश्न विशेष घोंटाळयाचा आहे, अशांतला भाग नाहीं. पण अधिकारी विद्वानांची आधारलालसा थोडक्यानें तृप्त होणारी नाहीं, असा अनुभव आला असल्यानें एकवार तरी सविस्तर विवेचन करणें आवश्यक आहे. या प्रश्नाची विस्तारपूर्वक चर्चा करण्यानें तत्कालीन परिस्थितीचें यथार्थ दर्शन होण्याला वाचकांनाहि सहाय होण्याजोगें आहे. नाहींतर शिवाच्या गणांत शृंगी असल्याचें आपल्याला माहीत आहेच, तेव्हां शिवासांच्या बरोबर विषाणिनांना पाहून कोणाला नवल वाटण्याचें कारण नाहीं. पण पुराव्याचा भार या कोटीवर सोंपविल्यास अधिकारी विद्वानांना हा प्रबंध विद्वत्त्वपूर्ण नाहीं आणि त्यामुळेंच अविश्वसनीय आहे, असें वाटेल. याकरतां थोडे परिश्रम केले पाहिजेत. शिवाचें वाहन जो नंदी त्या नंदीचे भक्त विषाणिन् असणें शक्य आहे. या दृष्टीनें विचार केला असतां असें आढळून येतें कीं ज्यांच्या नांवाच्या अंतीं उक्षन् शब्द येतो, अशा अनेक वीरांचे अवेस्त्यांत उल्लेख आहेत. भारताच्या उद्योगपर्वांत भीमानें उल्लेखिलेल्या अठरा कुलनाशक कुप्रसिद्ध व्यक्तींत नंदिवेगांतील शमाचेंहि नांव आलें आहे. या वेग शब्दाचेंच आधुनिक फारशींत बेग हें रूपांतर झालें असल्यानें नंदिवेग हे इराणी होते, असें साधार म्हणतां येतें. वेदांतहि ८–२५–२२ या स्थळीं उक्षण्यायन आणि हरयाण हीं नांवें आढळतात. हीं नांवें पाहून ऋग्वेद-कालीं हर आणि नंदी या उभयतांचेंहि अस्तित्व होतें, असें निश्चितपणें वाटतें. पण असल्या सरळ गोष्टी अधिकारी विद्वानांना सांगूनसुद्धां पटत नाहींत, हें केवळ सांगणाऱ्यांचें दुर्दैव होय. त्यांचा यावर असा आक्षेप निघतो कीं ऋग्वेद-कालीं स्वतः हरच माहीत नव्हता, मग त्याचें यान तरी कोठून माहीत असणार ? या हटवादीपणाला उत्तर देणें अवघड

आहे. दहाव्या मंडलाच्या १३६ व्या सूक्ताच्या अंतीं 'केशी विषस्य पात्रेण यद्रुद्रेणापिबत्सह' असा रुद्राच्या विषपानाचाहि स्पष्ट उल्लेख आलेला आहे. तरीसुद्धां हे अधिकारी विद्वान म्हणणार कीं ऋग्वेदाच्या कालीं हर हें दैवत आणि त्या दैवताचें चरित्र माहीत नव्हतें! वरील स्पष्ट उल्लेखाचें महत्त्व नष्ट करण्याकरतां कित्येकांनीं या ठिकाणीं विष शब्दाचा अर्थ पाणी करण्याची पाणचट क्लृप्ति काढली आहे. 'विप्पं जलधरैः पीतं मूर्छिताः पथिकांगनाः' अशा घटना घडत असल्या तरी रुद्राच्या विषपानाचा उल्लेख पाहून अधिकारी विद्वानांच्या विवेकबुद्धीनें मूर्छित पडलेंच पाहिजे असें नाहीं!

या हरयाण शब्दाचा निरुक्तकारांनींहि कांहीं भलताच अर्थ केला आहे, त्याचाहि या ठिकाणीं विचार करणें आवश्यक आहे. निरुक्ताच्या पांचव्या अध्यायांत 'कौरयाणः कृतयानः, तौरयाणः तूर्णयानः, हरयाणः हरमाणयानः' असे तीन शब्दांचे अर्थ दिले आहेत. पण ते सर्वच अर्थ चूक आहेत. यांपैकीं पहिल्या शब्दाचें स्पष्टीकरण निरुक्ताच्या मराठी भाषांतरकारांनीं उत्कृष्ट केलें आहे. 'कुरयाणस्य पुत्रः कौरयाणः, कुरेभ्यः कुरेषु वा यानं गमनं यस्य सः कुरयाणः' हा अर्थ मला सर्वस्वीं मान्य आहे. याच्याच अनुकरणानें तौरयाण आणि हरयाण यांचे अर्थ लाविले पाहिजेत. पण तेवढें धारिष्ट कै. राजवाड्यांनाहि झालें नाहीं. कुर देशाला जाणारा तो कुरयाण, तुर देशाला जाणारा तो तुरयाण आणि हर देशाला जाणारा तो हरयाण असे या साऱ्या शब्दांचे अर्थ होऊ शकतात. यांपैकीं कुरदेश हा कुर नदी ज्यांतून वाहते असा कॉकेशसचा भाग होय. तुर म्हणजे तुराण हें वर सांगितलेंच आहे. हर देश हा बहुधा शिवासांच्या व्यतिरिक्त आणखी एखादा देश असावा, अशी माझी समजत आहे. पण त्या स्थळाची निश्चिति आतांच करितां यत नाहीं. सर थॉमस होल्डिच यांच्या ग्रंथांत पुढील माहिती आढळते.

'Hariana is a small town built at the foot of a

mountain and on the banks of a river which taking its source near Panjshir joins its waters to the Nahrwara or the Kabul river.' (पान २७६)

या माहितीवरून काबूल नदीला मिळणाऱ्या एका लहान नदीच्या काठीं हरयाण नांवाचें एक लहानसें नगर होतें, असें कळतें. येथें त्या नदीचें नांव स्पष्ट सांगितलें असतें तर हरयाणासंबंधीं निश्चिति झाली असती. असो, हरयाण शब्दाचा हर देशाला जाणारा असा अर्थ केला तरी त्यानें हराचें यान हा अर्थ तेव्हां माहीतच नव्हता, असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं.

आतांपर्यंत झालें इतकें आधारशास्त्राचें स्तवन पुरें झालें, असें मला वाटतें. पण आधार मागणाऱ्यांची तृप्ति अद्यापि झाली नसेल या भीतीनें आणखीहि एक दोन आधार देऊन ठेविले पाहिजेत. अवेस्त्यांतील चौदावा यस्त वर्हेरान् यस्त या नांवानें प्रसिद्ध आहे. या प्रकरणाच्या प्रारंभीं जरथुस्त्रानें सद्धर्मियांना सहाय करणाऱ्या सशस्त्र देवदूतांमध्यें सर्वांत श्रेष्ठ कोण असा अहुरमझ्दाला प्रश्न केला असतां त्यानें उत्तर दिलें कीं वेरेथ्रघ्न. हाच प्रश्न पुनः पुनः विचारला असतां वेरेथ्रघ्नानें त्याला निरनिराळ्या दहा स्वरूपांत दर्शन दिलें. यांपैकीं पहिलें दर्शन त्यानें वायुदेवाच्या स्वरूपांत दिलें, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. ऐतरेय ब्राह्मणांत वायूला प्रजापतीचें स्वरूप मानिलें आहे. भारतीय युद्धकथेचा आद्य नायक जो भीम तोहि वायुपुत्रच आहे. पण वायूवरून सुचणाऱ्या साऱ्या कल्पनांची चिकित्सा करण्याचें हें स्थळ नव्हे. यानंतरचें दर्शन त्यानें वृषभाच्या स्वरूपांतच दिलें, ही गोष्ट विषाणिनांच्या देशाचा विचार करतांना सतत लक्ष्यांत ठेविली पाहिजे. यापुढील दर्शनें क्रमानें अश्व, उष्ट्र, वराह, पंचदशवर्षीय कुमार, गरुड ( वारेगन पक्षी ), एडका, मेंढा आणि सरतेशेवटीं पूर्णपणें वयांत आलेला वीर अशा विभिन्न स्वरूपांत दिलीं. दशावतारांच्या कल्पनेची ही कदाचित् पहिलीच

आवृत्ति असेल. येथें सांगण्याचा मुद्दा हा कीं अश्व, उष्ट्र, मेंढा इत्यादि पशुनामांनीं विभूषित झालेले मानव त्या काळीं इराणांत मिरवत असतांना एकट्या विषाणिनांच्या अर्थात् वृषभांच्या अस्तित्वाविषयीं इतकी साशंक वृत्ति बाळगण्याचें कांहींच कारण नाहीं. हा सारा पुरावाहि आमच्या अधिकारी विद्वानांना पुरेसा वाटत नसला तर त्यांनीं इतःपर आपल्या पुराव्याच्या कल्पना बदलाव्यात, अशी माझी त्यांना विनम्र विनंति आहे. कारण चार्वाकवाद्यांप्रमाणें प्रत्यक्ष हा एकच पुरावा, अनुमान हें प्रमाणच नव्हे, अशी त्यांची भूमिका होऊं लागली आहे.

वरील विवेचनांत एका शंकेचें निरसन करावयाचें राहून गेलें आहे. ती शंका म्हणजे विषाणिन् हे वृषभच्च कां ? मृग, वराह इत्यादि इतर शृंगी कां नव्हेत ? याचें अगदीं खरें उत्तर म्हणजे ज्या काळीं या टोळ्या या विशिष्ट नांवांनीं वावरूं लागल्या, त्या काळीं वसंतसंपात वृषभेंत असल्यामुळें इतर सर्व शृंगींपेक्षां वृषभाला अधिक महत्त्व प्राप्त झालें होतें. दुसरें असें कीं, ऋग्वेदकाळीं वृषभमस्तकाशीं सदृश अशीं शिरस्त्राणें वापरण्याचा प्रघातहि कांहीं टोळ्यांच्यामध्यें प्रचलित होता. वसिष्ठमंडलाच्या ९९ व्या सूक्तांत 'दासस्य चित् वृषशिप्रस्य माया जघ्नथुर्नरा पृतनाज्येषु' असा याविषयीं उल्लेखहि आला आहे. या उल्लेखावरून वृषशिप्र हे वसिष्ठांच्या पक्षाचे शत्रु होते, हें सिद्धच आहे. याकरतांच असें अनुमान करावेंसें वाटतें कीं वृषशिप्र आणि विषाणिन् असे वसिष्ठांच्या पक्षाचे दोन विभिन्न वैरी असण्यापेक्षां तीं दोनहि एकाच इराणी टोळीचीं नांवें असावींत. सरतेशेवटीं येथें हेंहि सांगून ठेविलें पाहिजे कीं हिंदुस्थानांतील अर्वाचीन क्षत्रियकुळांत बिसेन नांवाचें एक कुळ आहे. हें कुलनाम विषाण शब्दापासूनच उद्भवलें असण्याचा संभव बराच आहे. हें सारें विवेचन लिहिल्यानंतर इराणांतील शुष्ण लोकांना शृंगी म्हणत असल्याचा उल्लेख आढळला आहे. तेव्हां त्या प्रश्नाचा आतां पूर्ण निर्णय झाला आहे, असें म्हणतां येतें. १-३३-१२ या ऋचेंत

'वि शृंगिणम् अभिनत् शुष्णम् इंद्रः' असा उल्लेख असल्यानें शुष्ण हेच विषाणिन् होते, असें निश्चयानें सांगतां येतें.

याव्यतिरिक्त भेद, अजास, वैकर्ण, शिग्रु, शिम्यु, अनु इत्यादि सुदास-शत्रूंचा उल्लेख वसिष्ठाच्या विजयसूक्तांतून आला आहे. यांपैकीं भेद शब्दाचे नास्तिकता आणि दुही असे अर्थ सायणाचार्यांसारख्यांनीं केले आहेत. पण भेद हें एका कुळाचें नांव होतें, याविषयीं मला मुळींच शंका नाहीं. भेदाचा उल्लेख अथर्ववेदांतील बाराव्या कांडामध्यें चौथ्या सूक्तांत आला आहे.

उतैनां भेदो नाददात् वशामिंद्रेण याचितः ॥ ५० ॥

कांहीं जणांच्या तोंडून भेदी हें आडनांव मी अनेकदां ऐकलें आहे. अर्थात् दाशराज्ञ युद्धांतल्या भेदांशीं वर्तमानकाळींच्या भेदींचा अविच्छिन्न संबंध असल्याचा पुरावा देणें अशक्य आहे. पण त्याची येथें आवश्यकताहि नाहीं. असो, आजच्या इराणांत अजी नांवाची नदी आहे. तिच्याच प्राचीन नामावरून तिच्या तीरावरील जनांना अजास ही संज्ञा मिळणें शक्य आहे. अवेस्त्यांत अजान्त नामें हवीं तितकीं सांपडतात. प्राचीनकाळीं इराणांत वेर्कान नांवाचा एक प्रांत होता. याचाहि उल्लेख अवेस्त्यांत आढळतो. या वेर्कानचें मूळ स्वरूप वृकन् असें होतें. याचाच बिकन् असा अपभ्रंश असीरियाचा राजा असरहद्न याच्या ख्रि. पू. ६७० च्या सुमारास खोदलेल्या लेखांतून आढळतो. याच प्रांतनामापासून वैकर्ण हें जननाम साधलें आहे, याविषयीं शंका नाहीं. शिग्रु हें नांव अवेस्त्यांतील शिगुर या नामाशीं संबद्ध आहे. अवेस्त्यांतील फरवर्दीन यस्त या भागांत श्येनाचा पुत्र शिग्रय, शिग्रयाचा पुत्र विद्द कवय असे उल्लेख असल्याचें माझ्या टिपणांवरून समजतें. पण हे उल्लेख अवेस्त्याच्या ज्या जर्मन भाषांतरांतून उतरून घेतले आहेत, तो ग्रंथ हातीं नसल्यानें आतां पुनः ताडून

पाहण्याला साधन नाहीं. विट् कवय या नांवाशीं सदृश असें नांव दहाव्या मंडलांतील १७१ सूक्ताच्या कर्त्याचें इट भार्गव असें आहे. इराणी व्‌चा लोप होऊन संस्कृत नांवें केव्हां केव्हां होतात, हें भाषाशास्त्रज्ञांना माहीत आहेच. शिगुर आणि शिग्रय या नांवावरून शिग्रु इराणी होते, इतकें सिद्ध झालें तरी सध्या आपल्याला पुरें आहे.

आतां शिम्यूंचा थोडा शोध केला पाहिजे. वसिष्ठाच्या विजयसूक्तांत 'शधन्तं शिम्युं उचथस्य नव्यः शापं सिंधूनाम् अकृणोत् अशस्तीः' एवढीच शिम्यूविषयीं माहिती आली आहे. या माहितीवरून शिम्यु हा धर्मगुरूंपैकीं असावा, अशी कल्पना होते. प्राचीन काळीं नदीवर पूल बांधणें आणि तिला उतार शोधणें हीं धर्मगुरूंचींच कर्तव्यें होतीं. याकरितां नदीमुळें स्वपक्षावर एखादी आपदा ओढवली तर लगेच धर्मगुरूंची दुष्कीर्ति होत असे. दाशराज्ञ युद्धांत परुष्णीच्या लोंढ्यामुळें चायमानाच्या पक्षाचे जे शिम्यु, त्यांची अशीच अनुकंपनीय अवस्था झाली. 'प्रथम ऐट करीत असलेल्या शिम्यूला, त्यानें आधीं आरंभिलेल्या नद्यांच्या स्तुतीच्या जागीं, त्यांच्या नव्या निंदा आणि शाप उच्चारावयाला इंद्रानें भाग पाडलें', असा वर उतरून घेतलेल्या वचनाचा अर्थ दिसतो. विश्वामित्राच्या नदी-स्तुतीप्रमाणेंच शिम्यूची नदीनिंदा जर कोणी वंशपरंपरेनें संभाळली असती तर तेव्हांचा इतिहास समजावयाला तिचा पुष्कळच उपयोग झाला असता. पण परुष्णीच्या लोंढ्यांत वाहून गेल्यामुळें ती बहुधा समकालीनांनाहि उपलब्ध झाली नसावी! शिम्यूंचा आणखी एक उल्लेख प्रथम मंडलाच्या शंभराव्या सूक्तांत आढळतो. त्या सूक्तांत दस्यूंसह शिम्यूंचा इंद्रानें कांटा काढला, असें सांगितलें आहे.

वर उल्लेखिलेल्या नांवांपैकीं आतां एकट्या अनूंचा विचार करावयाचा राहिला.

अनु हें नांव इराण-तुराणांतील उत्खननामुळें प्राचीनेतिहास-संशोधकांना अतिपरिचित झालें आहे. या ठिकाणीं ख्रि. पू. ९००

वर्षांपासूनचे अवशेष सांपडतात, असें तज्ज्ञांचें मत आहे. अमूची संस्कृति आणि सुसाची संस्कृति एकच असावी, असाहि अभिप्राय तज्ज्ञांनीं व्यक्त केला आहे. ऋग्वेदांत आनव राजा श्रुतर्वा यानें मृगयांचा म्हणजे अर्वाचीन मर्व्ह प्रांतांतील जनांचा पराभव केल्याचा उल्लेख आढळतो. आणि अर्वाचीन संशोधकांचें अनु नगर मर्व्हपासून फार दूर नसल्यानें प्राचीन अनुकुलाचें वसतिस्थान तेंच असणें स्वाभाविक आहे. या प्रश्नाची अधिक चर्चा 'इराण, तुराण आणि हिंदुस्थान' या प्रकरणांत आली आहे.

सुदासाच्या या साऱ्या शत्रूंत पुरूंचा उल्लेख करावयाचा राहिला. पुरूंनीं परुष्णी-तीरावरील युद्धांत फारसा भाग घेतलेला नव्हता. त्या लढाईनंतर झालेल्या घडामोडींतच त्यांचा उल्लेख आढळून येतो. वसिष्ठाच्या विजयसूक्तांत 'जेष्म पूरूं विदथे मृध्रवाचम्' म्हणजे 'यापुढें पुरूला समोरासमोर युद्धांत जिंकूं', असेच उद्गार आढळतात. तेव्हां त्यांचा अन्यत्र विचार करणेंच सोयीचें होईल.

——:०:——

# पांचाल सुदास आणि त्याचे सहकारी

दाशराज्ञयुद्धांतील विजयी वीर सुदास हा पांचाल घराण्यांतील होता, अशी सामान्य समजूत आहे आणि ती खरी असावी असें मलाहि वाटतें. तेव्हां तेवढी कल्पना खरी धरूनच मी पुढील विवेचनाचा प्रारंभ करणार आहें.

सुदासाच्या घराण्याला पांचाल हें नांव कशामुळें प्राप्त झालें असावें, याचा प्रथम विचार केला पाहिजे. या प्रश्नाचा विचार करतांना मला दोन कल्पना सुचतात. एक तर हिंदुस्थानाच्या उत्तर टोंकाजवळच्या चित्रळ संस्थानांतील पांचाल पर्वतावरून सुदासाच्या घराण्याला तें नांव मिळालें असावें. नाहीं तर हिंदुस्थानाच्या उत्तर सीमेला अगदीं लागून असलेल्या आब इ पंज या नदीवरून तें नांव मिळालें असावें. कारण आब इ पंज म्हणजे पंचजल आणि पांचाल शब्दांतील शेवटच्या आल शब्दाचा अर्थ जल असाच होतो, हें विद्वानांना कदाचित् माहीत असेल. यांपैकीं दुसरीच कल्पना मला अधिक संभवनीय वाटते. त्याचें कारण असें आहे कीं या घराण्यांतील कांहीं व्यक्तींच्या नांवापुढें गव हा प्रत्यय लागलेला आढळून येतो आणि अवेस्ता ग्रंथावरून असें कळतें कीं प्राचीन काळीं सोग्डियाना प्रांताला गव ही संज्ञा होती. आब इ पंज आणि गव यांचा परस्परसंबंध असा आहे कीं आब इ पंज ही नदी गव प्रांतांतूनच वहात जाते. तेव्हां पांचाल नदीतीरावरील गव प्रांतांतून पांचालांचें कुल हिंदुस्थानांत आलें होतें असें मानलें तरच त्यांच्या व्यक्तिनामांचा आणि कुलनामाचा उलगडा होऊं शकतो. वरील विवेचन सामान्य वाचकांना सुबोध होण्याकरतां इतकें सांगणें आवश्यक आहे कीं गव प्रांत म्हणजे

समर्कंद आणि बुखारा हा प्रांत, आणि आब इ पंज हें ऑक्सस नदीचें उगमाकडील भागांतलें नांव आहे. बदकशान प्रांत ओलांडून जाईपर्यंत ऑक्सस नदीला हीच संज्ञा आहे, असें मानचित्रावरून कळतें. माझ्या लेखांतून मी संपूर्ण संदर्भ देत नाहीं, असा एक आक्षेप वारंवार ऐकूं येतो, त्याचेंहि निरसन येथेंच करणें सोयीचें होईल. जे संदर्भ अवेस्त्याची सूचि पाहिली असतां किंवा कोणताहि चांगल्यापैकीं मानचित्रग्रंथ पाहिला असतां सांपडण्याजोगे आहेत, त्यांचा केवळ पांडित्यप्रदर्शनाकरतां उद्धार करण्याची संवय मला अद्यापि जडलेली नाहीं. संदर्भ शोधण्यासाठीं ज्यांना इतपत श्रमसुद्धां करवत नसतील, त्यांना कधींच कोणत्याहि विषयाचें आकलन होण्याचा संभव नाहीं. असो, जरथुस्त्र-चरित्रविषयक प्राचीन लेखांतून त्यानें पर्षत्गाव नांवाच्या राजाला आपली दीक्षा देण्याचा प्रयत्न केल्याचा उल्लेख आढळतो. पृषत् आणि पार्षत् हीं पांचाल कुलांतलि राजांचीं नांवें आहेत, हें संदर्भवाचकांना माहीत असेल, अशी आशा करून पुढच्या विवेचनाला लागतों.

दाशराज्ञयुद्धाच्या काळीं पांचालांचा चित्रळ संस्थानाशीं अतिशय निकटचा संबंध होता, हें लक्ष्यांत घेतल्यावांचून तत्कालीन इतिहास समजणें अशक्य आहे. दाशराज्ञयुद्धांतील सुदासाचे दोन शत्रु शिवास आणि मत्स्यास हे चित्रळ संस्थानाला लागून असलेल्या बदकशान प्रांताच्या उत्तरभागांत राहात होते. त्याच प्रांताच्या दक्षिणेकडील भागांतले रघ, द्रॉग आणि कतगण हे सर्व सुदासाचे पक्षपाती होते. अतिथिग्व पांचालानें ज्या गुंगु लोकांना करंजपर्णयांपासून वांचविलें, त्यांचें वसतिस्थानहि त्याच प्रांतांत होतें. चायमानानें ज्या वराशिखांचा संहार केला, त्यांचें निवासस्थान दाखवून देणारी बरसख नदीहि त्याच प्रांतांत आहे. बहुधा त्याच प्रांतांत सृंजयानें तुर्वशाला धरिलें आणि दैववातानें वृचीवंतांना जिंकलें. चित्रळ संस्थानाला प्राचीन काळीं चित्ररथ अशी संज्ञा होती. अर्ण आणि चित्ररथ यांना इंद्रानें

मारल्याचा उल्लेख तृतीय मंडलांत आला आहे. अर्णी आणि चित्रळी या भाषा त्या भागांत अजून चालतात.

बदकशान प्रांतांत पांचालांची हालचाल मोठ्या प्रमाणावर होत होती, हें निश्चितपणें ठरविल्यानंतर त्या भागांत त्यांचे प्रमुख सहकारी कोण होते, याचा विचार केला पाहिजे. पांचाल सुदास हा दैववाताचा नातू होता, असा वसिष्ठाच्या सूक्तांत उल्लेख आला आहे. दैववातानें म्हणजे देववाताच्या पुत्रानें वृचीवंतांना जिंकल्याचा उल्लेख आतांपर्यंत अनेकदा या प्रबंधांत आलाच आहे. पंचविंश ब्राह्मणांत अशी माहिती आढळते कीं जन्हु आणि वृचीवंत यांच्यांत युद्ध जुंपलें असतां जन्हूंचा राजा विश्वामित्र यानें चतूरात्र नांवाचा याग करून त्याच्या प्रभावानें वृचीवंतांना जिंकलें. ( २१-१२-२ ते ४ ) या सर्व माहितीची परस्पर-संगति लाविली असतां असें दिसतें कीं वृचीवंतांना जिंकणारा दैववात हा जन्हूचा राजा विश्वामित्रच असून देववत् आणि देववात हीं नांवें एकच मानलीं तर त्याला सुदास पांचालाचा मामा म्हणतां येईल. ही कल्पना ग्राह्य मानल्यास विश्वामित्राला सुदासाविषयीं इतकें अगत्य कां वाटत होतें, याचा चांगला उलगडा होतो.

वरील सर्व माहितीच्या अनुरोधानें विचार केला म्हणजे मगच विश्वामित्राच्या नदीसूक्ताचा खरा अर्थ समजूं लागतो. कुत्स, अतिथिग्व आणि दिवोदास यांना चायमानाच्या हस्तकांनीं अटक केल्यानंतर पांचाल, जन्हु आणि रघु या तीन कुलांमध्यें त्यांच्या योग्यतेचा वीर दैववात विश्वामित्रावांचून दुसरा कोणीच उरला नव्हता. सुदासाचा पिता दिवोदास आणि आजा अतिथिग्व यांना युद्धक्षेत्रांत अटक झाली, तेव्हां सुदास अजून अज्ञान असणें अगदीं शक्य आहे. अशा परिस्थितींत आपल्या भाच्याच्या राज्यरक्षणाचा भार विश्वामित्रानें स्वतःच्या शिरावर घेणें स्वाभाविक होतें. दैववात विश्वामित्राच्या शिरावर जेव्हां हा भार पडला, तेव्हां चायमानासारख्या प्रबळ सम्राटाशीं टक्कर घेण्याजोगी त्यांची

परिस्थिति नव्हती. याकरतां त्यानें वदकशान आणि चित्रळ या प्रांतांचा एकदम त्याग करून शुतुद्रि आणि विपाशा या नद्या संगमापाशीं ओलांडून यमुनाकांठींच्या प्रांतांत आश्रय घेतला. ही माघार घेत असतांना चायमानाच्या अनुयायांनीं सारखा पाठलाग चालविला असल्यामुळें जन्हुपांचालादींची दीनवाणी स्थिति झाली असल्यास नवल नाहीं. विश्वामित्रनदी संवादांत आपण फार दुरून आल्याचा विश्वामित्रानें जो निर्देश केला आहे, तो अक्षरशः वस्तुस्थितिनिदर्शकच आहे. या सुदीर्घ माघारीनंतरहि त्याचा धीर यत्किंचित्सुद्धां खचलेला दिसत नाहीं, किंवा त्याच्या काव्यप्रतिभेला ग्रहण लागल्याचीं लक्षणें आढळत नाहींत, ही खरोखरीच नवलाची गोष्ट आहे. अशा अलौकिक व्यक्तीनें 'विश्वामित्रस्य रक्षति ब्रह्मेदं भारतं जनम्' असा अभिमानानें उद्गार काढल्यास तो अक्षरशः खरा वाटतो. ऐतरेय ब्राह्मणांत ( ७-३-५ ) आणि शांखायन श्रौतसूत्रांत ( १५-२५ ) विश्वागित्राला भरतर्षभ ही संज्ञा दिली आहे. यावरूनहि विश्वामित्राची वास्तविक योग्यता कळून येते.

विश्वामित्र आणि सृंजय हे भाऊ होते कीं काय अशी एक ऋग्वेदावरून शंका येते. चौथ्या मंडलाच्या १५ व्या सूक्तांत सृंजयाला दैववात ही संज्ञा लाविली आहे. पण सहाव्या मंडलाच्या २७ व्या सूक्तांत 'स सृंजयाय तुर्वशं परादाद् वृचीवतो दैववाताय शिक्षन्।' असा सृंजय आणि दैववात यांचा भिन्न भिन्न उल्लेख आला आहे. येथें सृंजयानेंच तुर्वश आणि वृचीवत् यांचा पराजय केला, असा अर्थ करणें उचित होणार नाहीं. त्यापेक्षां देववाताच्या वारसानें म्हणजे दैववातानें वृचीवंतांचा पराजय केला आणि त्याचा भाऊ जो सृंजय त्यानें तुर्वशाला जिंकलें, असा अर्थ करणें अधिक योग्य होईल. वृचीवंतांना जन्हूंचा राजा विश्वामित्र यानें जिंकल्याचा पंचविंश ब्राह्मणांतील उल्लेख वर आलाच आहे. तेव्हां 'स्थितस्य गतिश्चिंतनीया' या न्यायानें विश्वामित्र आणि सृंजय हे भाऊ होते, असें म्हणावें लागतें. विश्वामित्रानंतर

जन्हुकुलाचा मुळींच उल्लेख ऐकूं येत नाहीं आणि एकदम सृंजयाचें नांव ऐकूं येऊं लागतें, यामुळेंहि वरील अनुमानाला दुजोरा मिळतो. विश्वामित्राचे वंशज ब्राह्मण झाल्यानें किंवा शुनःशेपाला आपला ज्येष्ठ पुत्र करण्याचा विश्वामित्राचा हट्ट जन्हूंना न रुचल्यामुळें त्याच्यामागून बहुधा सृंजयाचा अधिकार जन्हुजनांवर चालूं लागला असावा आणि घराण्याच्या धाकट्या शाखेकडे सत्ता गेल्यामुळें पांडवांप्रमाणेंच सार्जय नांव प्रचलित झालें असावें. पुढें कदाचित् सार्जयांना सुदासाच्या वंशाविरुद्ध चिथावणी देऊन कुरूंनीं भारतांत प्रवेश मिळविला असावा. या प्रश्नाची आणखी चर्चा पुढें करावी लागेल.

आधुनिक विद्वानांच्या पुढें विश्वामित्र राजा होता कीं पुरोहित होता, असा प्रश्न नेहमीं उपस्थित होतो. कारण सुदासाच्या पौरोहित्यासाठीं त्याची आणि वसिष्ठाची स्पर्धा चालत असे, अशी त्यांची कल्पना आहे. पण हा प्रश्न केवळ इतिहासाच्या अज्ञानामुळें उपस्थित होतो, असें म्हणणें भाग आहे. प्राचीन काळीं राजाला राजाचीं आणि शंकराचार्याचीं अशीं दुहेरी कर्तव्यें पार पाडावीं लागत. यामुळें तेव्हां राजाला ऋषि होणें भागच होतें. राजाप्रमाणेंच इतर राजन्यांचीहि स्थिति होती. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील १३३ वें सूक्त पिजवनपुत्र सुदास याचें आहे. त्यामुळें कोणी सुदासाला पुरोहित ठरविलें नाहीं. प्रतर्दन, ऋणंचय, पृथु, मांधाता इत्यादींच्या नांवावरहि सूक्तें आहेत म्हणून त्यांनाहि कोणी निश्चितपणें पुरोहित मानीत नाहींत. दिवोदासाला पकडणाऱ्या वध्र्यश्वाचा पुत्र सुमित्र वाध्र्यश्व याचीहि ( १०–६९ आणि ७० ) दोन सूक्तें असून त्यांत त्यानें आपल्या कुळाच्या शौर्याचें आणि आपल्यावरील अग्नीच्या कृपेचें वर्णन केलें आहे. सृंजयाचा पिता जो देववात त्याचेंहि एक सूक्त विश्वामित्राच्या मंडलांत आहे. पण तेवढयानें त्याच्यावरहि कोणी पुरोहितपणाचा आरोप केला नाहीं. ही गोष्ट खरी कीं वरील

व्यक्तींपैकीं कोणीहि यज्ञांतून ऋत्विजाचें काम केल्याचा उल्लेख आढळत नाहीं. पण यज्ञांत काम करीत असतांनाहि विश्वामित्राला राजपुत्र म्हणूनच संबोधिल्याचा ऐतरयांत पुरावा आहे. कतगण प्रांतांतून पराजित होऊन जान्हवीतीरावर जन्हुजनांना स्थैर्य लाभेपर्यंतच्या काळांत विश्वामित्राला आपल्या धर्मपांडित्याचा उपयोग वारंवार करावा लागला असेल. पण तेवढ्यानें ऋग्वेदांतील विश्वामित्र पुरोहित ठरतो, असें मला वाटत नाहीं. विश्वामित्र पुरोहित असावा, अशी शंका येण्याजोगें एकच स्थळ तिसऱ्या मंडलांत आढळून आलें आहे. तें म्हणजे ५३ व्या सूक्तांतील 'इमे भोजा: अंगिरसो विरूपा: दिवस्पुत्रासो ..सुरस्य वीरा:। विश्वामित्राय ददतो मघानि सहस्रसावे प्रतिरंत आयु :॥' हें वचन होय. पण या वचनाचा परंपरागत अर्थ सपशेल चूक आहे. 'मघ म्हणजे जरथुस्त्राचे अनुयायी, त्यांना आंगिरसविरूपभोजादींनीं जिंकून विश्वामित्राच्या स्वाधीन करावें आणि सहस्रवार्षिक यज्ञाच्या प्रसंगीं त्याला संकटमुक्त करून त्याचें आयुष्य वाढवावें' असा त्या ऋचेचा वास्तविक अर्थ आहे. वरील वचनांतील भोज शब्दाचा अर्थ भाष्यकारांनीं भिन्न केला असला तरी त्याचा खरा अर्थ या स्थळीं कुलवाचकच आहे. वसिष्ठाच्या विजयसूक्तांतहि 'न ते भोजस्य सख्यं मृषन्त' म्हणजे 'तुझें-भोजान्चें सख्य वसिष्ठादींनीं कधींच अवमानिलें नाहीं,' असा सुदासाला अनुलक्षून उल्लेख आला आहे.

वर आलेल्या आंगिरस, विरूप आणि भोज या नांवाचा येथें थोडा अधिक विचार केला पाहिजे. आंगिरस कुळाचें जरथुस्त्राच्या अनुयायांशीं सर्वांत प्रथम वांकडें आलें असल्याची माहिती अन्यत्र आलीच आहे. त्यांच्या आणि वृककुलाच्या उपद्रवामुळें त्यांनीं इतरांच्या आधीं इराणाचा त्याग केला होता. विरूपांचा आंगिरसकुलाशीं निकटचा संबंध होता, असें अनुशासन पर्वाच्या ८३ व्या अध्यायावरून समजतें.

अष्टौ चांगिरसः पुत्रा आग्नेयास्तेयुदाहृताः ॥
बृहस्पतिरुतथ्यश्च पयस्यः शांतिरेवच ॥
घोरो विरूपः संवर्तः सुधन्वां चाष्टमः स्मृतः ॥

तेव्हां घोरांप्रमाणेंच विरूपहि आंगिरस होते, असें या वचनावरून निश्चितपणें कळून येतें. आतां राहतां राहिले भोज. या भोजांचें कुल भारतीय आर्यांच्या इतिहासांतील अगदीं आद्य कुलांपैकीं एक होतें. सभापर्वांत कृष्णानें म्हटलें आहे कीं भोजकुलांतील राजे. गुणवान् असून ते चारी दिशांना पसरले आहेत. त्याच भाषणांत जरासंधाच्या भीतीनें अठरा भोजकुलें उत्तर देश सोडून इतरत्र गेल्याचा उल्लेख आला आहे. या प्रसंगीं भोजांसह पांचालाचींहि कुलें वाट फुटली तिकडे पळून गेलीं, असें कृष्णानें म्हटलें आहे. त्यावरून भोजांचा आणि पांचालांचा निकट संबंध व्यक्त होतो. ऋग्वेदाच्या ५३ व्या सूक्तांत सांगितल्याप्रमाणें विश्वामित्रानें सुदासाचा घोडा अश्वमेधाप्रीत्यर्थ सोडला, तो या सर्वांच्या सामर्थ्यावर विश्वासूनच सोडला होता.

एवढ्यानेंच ही चिकित्सा संपत नाहीं. डॉ. एजर्टन यांनीं संपादिलेल्या सभापर्वावरून अशी शंका येते कीं जरासंधाच्या भयानें जे अठरा उदीच्यभोज पश्चिमेला पळून गेले होते, त्यांच्यांतच पांचालांचा समावेश होत असावा. कारण लगेच पुढें दिलेल्या नाममालेंत शूरसेनांसहच पांचालांचा उल्लेख आहे आणि शूरसेनकुल मथुरा सोडून पश्चिमेला द्वारकेकडे गेलें, हें सर्वांना माहीत असेलच. या स्थळीं संपादकांनीं शूरसेनपांचालादि कुळें दक्षिणेकडे गेलीं, 'दक्षिणांदिशमाश्रिताः' असें छापलें असलें तरी त्यांतील 'दक्षिणां' या शब्दाविषयीं स्वतःच संशय प्रदर्शित केला आहे. भोज आणि पांचाल यांच्याप्रमाणेंच आंगिरस आणि पांचाल यांचे संबंध असावेत, असें मानण्यालाहि थोडाफार पुरावा आहे. महाराष्ट्रांत स्वतःला पंचाल ब्राह्मण म्हणविणारीं सुमारें एक लक्ष जनांची

एक ज्ञात आहे. या जातींतील वेदविदांचें म्हणणें असें आहे कीं, 'आम्ही मूळचे आंगिरस ब्राह्मण असून पंचाल हें नांव आम्हांला मागाहून मिळालेलें आहे.' या पंचाल ब्राह्मणांची परंपरागत माहिती खरी असल्यास आंगिरस हेच पुढें पांचाल झाले, असें म्हणावें लागतें. या पंचालांची माहिती यथार्थ असावी, अशी माझी स्वतःची समजूत झाली आहे. तिच्या सत्यतेवर इतरांचाहि विश्वास बसला तर प्राचीन पांचालांच्या इतिहासावर पुष्कळच नवीन प्रकाश पडणें शक्य आहे. याकरतां येथें थोडें विषयांतर करणें आवश्यक वाटतें. महाराष्ट्रीय पंचालांतील पांच प्रमुख गोत्रांत सुपर्ण हें एक गोत्र आहे. सुपर्णांचें अहि लोकांशीं असलेलें वैर सुप्रसिद्ध आहे. याच वैराचा प्रतिध्वनि अहिच्छत्रनगरींतील अहींनीं द्रोणाच्या द्वारां कौरवपांडवांचें सहाय मिळवून आपलें स्वतंत्र राज्य स्थापिल्याच्या भारतांतील कथेंत आढळून येतो. उत्तर पांचाल विरुद्ध दक्षिण पांचाल हा लढा मुख्यतः पांचालांतील सुपर्ण गोत्राचे लोक आणि द्रोणप्रभृति अहि यांच्यांतील हाडवैराचा द्योतक असावा, असें अर्वाचीन पंचालांच्या वंशेतिहासावरून म्हणतां येतें. पंचाल ब्राम्हण स्वतःला स्थपति म्हणवितात, हें लक्षांत घेतलें म्हणजे शतपथ ब्राह्मणांतील दुष्टरीतु पौंस्यायन या राजाच्या कथेचा नीट उलगडा होतो. सृंजयकुलांतील त्या राजाला पदच्युत व्हावें लागलें होतें आणि त्यानें परत गादीवर बसूं नये याकरतां प्रातिप्रीय बाल्हिक हा बलाढ्य राजा धडपड करीत होता. तरी सुद्धां त्याला न जुमानतां चाक्र नांवाच्या स्थपतीनें रेवोत्तरस् पाट याच्या सहायानें दुष्टरीतूकडून सौत्रामणी यज्ञ करवून त्याला परत त्याच्या पूर्वजांचें राज्य मिळवून दिलें. या कथेंत पांचालांचा प्रत्यक्ष उल्लेख नसला तरी सृंजयांचा आहे आणि त्यांचा पांचालांशीं अतिशय निकटचा संबंध होता, हें प्रबंधांत अनेकदां आलेंच आहे. तिसरी एक लक्ष्यांत घेण्याजोगी गोष्ट ही कीं पंचाल ब्राम्हण स्वतःला शिल्पी म्हणवितात. या शिल्पी शब्दाचाच भाऊ जो 'कारू', तो शब्द

स्वतः विश्वामित्राच्या नदीसूक्तांतून त्याला स्वतःलाच लाविलेला आढळतो. 'आ ते कारो शृणवामा वचांसि ययाथ दूरात् अनसा रथेन ।' ज्या काळीं धर्मकृत्यें करणाऱ्यांनीं शिल्पांचा त्याग केला नव्हता, त्या काळींच विश्वामित्रासारख्या मानी व्यक्तीला स्वतःला 'कारू' शब्द लावणें अपमानास्पद वाटलें नाहीं, हें उघड आहे. याच भावनेमुळें स्वतःला रथकार म्हणवून घेणाऱ्या महाराष्ट्रीय पंचालांना, त्या संज्ञेमुळें आपल्य ब्राह्मण्याला कमीपणा येतो, असें मुळींच वाटत नाहीं. या दृष्टीनें पंचालांनीं स्वतःच आपल्या प्राचीन इतिहासाची चिकित्सा केली पाहिजे

प्राचीन काळीं राजालाच आपल्या राष्ट्राच्या धर्माचार्यांचीं कर्तव्यें करावीं लागत. अशा राजांपैकीं विश्वामित्र हा हिंदुस्थानांतील बहुधा शेवटचाच राजा असावा. पुढें राजन्य आणि पुरोहित असे अगदीं विभिन्न वर्ग निर्माण झाल्यामुळें विश्वामित्राच्या दुहेरी जीवनाचा अर्थ त्या दोनहि वर्गांना दुर्बोध झाला. तेव्हां त्यांनीं विश्वामित्र मूळचा राजा असून ब्रम्हर्षि कसा झाला याविषयीं आपल्या बुद्धिप्रमाणें सत्यासत्याच्या मिश्रणानें कांहीं कथा लिहिल्या. त्या कथांतून सत्याचा अंश किती आहे याची चिकित्सा पुढें करावी लागणारच आहे. येथें सांगण्याचा मुद्दा हा कीं सुदासाचा काळ हा संक्रमणावस्थेचा काळ असल्यानें या वेळीं बहुतेक साऱ्या राजांनीं आपला धर्माचार्याचा अधिकार पुरोहितांकडे सोंपविला होता आणि पुरोहितांना तर आपल्या अधिकाराच्या मर्यादांची यथार्थ कल्पना नव्हती. इतकेंच नव्हे तर त्यांना त्या नवलब्ध अधिकारांची शाश्वतीहि वाटत नव्हती.

ब्रह्माणि एषां श्रुणुतं हवीमनि सत्या तृत्सूनामभवत्पुरोहितिः ।
(७-८३-४)

या वसिष्ठाच्या उद्गारांत याच अशाश्वतीची जाणीव दिसून येते. या संक्रमणावस्थेच्या कालांत राजा आणि पुरोहित यांचीं भांडणें वारंवार

उद्भवणें स्वाभाविक होतें; आणि दोघांच्या भांडणांत तिसऱ्याचा लाभ या न्यायानें हिंदुस्थानाच्या विदेशी शत्रूंनीं त्यापासून पुरेसा लाभ करून घेतलाच. शांतिपर्वांत म्हटलेंच आहे :

'ब्रह्मक्षत्रं यत्र विरुध्यतीह। अन्त्रग्वलं दस्यवस्तद्भजन्ति'॥

राजा आणि पुरोहित यांच्या कलहावर काठक संहितेंतील (२१-१०) एका उल्लेखानें अनपेक्षित प्रकाश पडला आहे. त्या ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं,भरद्वाजांनीं हिरावून घेतलेलें काशीचें राज्य प्रतर्दन राजानें परत मिळविलें. या कथेचें पुढें महाभारतांत असें रूपांतर झालें आहे कीं काशीच्या राजांचें राज्य वीतहव्यांनीं जिंकल्यानंतर तें राज्य परत मिळविण्याकरतां त्यांनीं भरद्वाजांकडून प्रतर्दन नांवाच्या पुत्राची प्राप्ति करून घेतली. या एका उदाहरणावरून असें समजून येतें कीं वंशावळींतून जेव्हां पुरोहितांनीं अमुक पुत्र अमक्या राजाला दिला असे उल्लेख येतात, तेव्हां पुरोहितांच्या उदरीं गेलेलें आपलें राज्य त्या विशिष्ट राजपुत्रानें त्यांच्याकडून परत जिंकून घेतलें असा त्या उल्लेखांचा अर्थ आहे. या दृष्टिनेंहि आपल्या प्राचीन इतिहासाची छाननी केली पाहिजे. या उल्लेखाचें आणखीहि एका दृष्टीनें महत्त्व आहे. द्रोण नांवाच्या भारद्वाजानें द्रुपद राजाचें राज्य लुबाडल्याचा इतिहास भारतांत आला आहे. तेव्हां ही भारद्वाजाची सनातन नीतिच होती कीं काय ?

दाशराज्ञ युद्धाच्या पूर्वीं राजे लोक धर्माचार्यांचींहि कर्तव्यें कां करीत असत, याची येथें आणखी थोडी चिकित्सा केली पाहिजे. मला असें वाटतें कीं तोंपर्यंत वैदिक धर्माला त्या काळानंतर लाभलेलें एकसंधी स्वरूप प्राप्त झालें नव्हतें. तेव्हां तो धर्म मुख्यतः कुलधर्मांच्या स्वरूपांत अस्तित्वांत होता.याचा पुरावा शुनःशेपाच्या आख्यानावरून मिळण्याजोगा आहे. विश्वामित्राच्या कुळांत देवश्रवा, देववात यांसारखीं देवसंज्ञक नांवें ठेवण्याचा प्रघात असल्यानें शुनःशेपाला दत्तक घेतल्यानंतर त्यानें

त्याला देवरात नांव ठेविलें. अंतीं 'रात' हा शब्द येणारीं नांवें अवेस्त्यांतहि आढळतात; त्यामुळें इराण आणि हिंदुस्थान यांचे परस्परसंबंध विच्छिन्न होण्यापूर्वीचें तें नांव असलें पाहिजे, हें उघड आहे. असो, त्यानंतर ऐतरेयांत पुढील महत्त्वाचा श्लोक आला आहे.

अधीयत देवरातो रिक्थयोरुभयोर्ऋषिः ॥
जन्हूनां चाधिपत्ये दैवे वेदे च गाथिनाम् ॥

या वचनावरून असें कळतें कीं जन्हूंच्या आधिपत्यासहच देवराताला विश्वामित्राच्या गाथी कुळांतील विशिष्ट देवविद्याहि प्राप्त झाली.

प्रत्येक कुळांतील देवविद्या हें जोंपर्यंत त्या कुळांतच काळजीपूर्वक संभाळलेलें रहस्य असतें, तोंपर्यंत सर्व कुळांना समान असा पुरोहितांचा वर्ग अस्तित्वांत येणें अशक्य असतें. या साऱ्या कुळांची विद्या अशीच गुप्त राहिली असती. पण जरथुस्त्री पंथाच्या उत्कर्षामुळें सर्व सनातनी कुळांना आपली विद्या प्रकट करून तिचें संकलन किंवा संहितिकरण करणें भाग पडलें. या पंथाविषयीं विश्वामित्राच्या कुळांतील व्यक्तींना किती द्वेष वाटत असे, हें कताच्या एका (१८) सूक्तांतील 'प्रति प्रतीचीर्दहतादरातीः' म्हणजे 'आमच्या पश्चिमेकडील शत्रूंना हे, अग्निदेवा, तूं जाळून टाक,' या प्रार्थनेवरून स्पष्टपणें कळून येतें.

विश्वामित्र आणि सुदास या उभयतांचीं कुळें मुख्यतः अग्निपूजक होतीं. अर्वाचीन काळांतील राजांना ज्याप्रमाणें देवळें बांधून अजरामर व्हावेंसें वाटतें, त्याप्रमाणेंच आदियुगांतील आर्यांना अग्न्यागारांची स्थापना करून आपल्या अंतःकरणांतील धर्मज्योति चिरंतन करावीशी वाटे. प्राचीन इराणांतहि यम, वृषणश्व आणि मित्र यांचीं अग्न्यागारें अतिशय पवित्र मानलीं जात; अतएव तीं आतिप्रसिद्धहि झालीं होतीं. दिवोदासाला जिंकणारा जो च्यवन [illegible], त्यानें स्थापिलेल्या

अग्न्यागाराचें १०६९ या सूक्तांत सरस वर्णन आलें आहे. याच प्रथेचें अनुकरण करून स्वतः दिवोदासानेंहि एक अग्न्यागार स्थापिलें होतें. ८–९२ या सूक्तांत दैवोदास अग्नीचा उल्लेख आला आहे. ६-१६-१९ या स्थळीं याहून स्पष्ट शब्दांत म्हटलें आहे: 'आ अग्निरगाभि भारतो वृत्रहा पुरुचेतनः। दिवोदासस्य सत्पतिः।' विश्वामित्रकुळांतील देवश्रवा आणि देववात यांनींहि असेंच एक अग्न्यागार स्थापिलें होतें. पुढेंसुद्धां सृंजयपांचाळांनीं आपली बहुयज्ञ.करण्याविषयींची कीर्ति टिकविली होती.

असो, सुदासाच्या सहकाऱ्यांपैकीं भोज, आंगिरस, विरूप, जन्हु अथवा कतगण इतक्यांची थोडीबहुत माहिती एकत्रित करितां आली. पण त्याच्या जोडीनें ज्या पुरुकुत्सानें दाशराज्ञ युद्धांत पराक्रम गाजविला त्याची कांहींच माहिती मला मिळूं शकली नाहीं. तो बहुधा कुत्साचा पुत्र आणि कतगणाजवळच्या रघ किंवा दाँग प्रांताचा अधिपति असावा, असें वाटतें. सूर्यवंशाच्या नामावळींत त्याचें नांव आढळतें. प्रत्यक्ष दाशराज्ञ युद्धाच्या वर्णनप्रसंगीं पुरुकुत्साविषयीं अधिक लिहावें लागेल. तेव्हां हें प्रकरण येथेंच संपविणें सोयीचें होईल.

———

# परुष्णीची लढाई

परुष्णीच्या तीरावरील निर्वाणीच्या लढाईंतल्या घटना कोणत्या क्रमानें घडून आल्या असाव्या, याचा आतां विचार केला पाहिजे. ७–८३–८ या स्थळीं वसिष्ठानें म्हटलें आहे–'दाशराज्ञे परियत्ताय विश्वतः सुदासे इंद्रावरुणौ अशिक्षत्।' पण या वचनावरून सुदासाला शत्रूचा पक्का वेढा बसला होता, असें समजण्याचें कारण नाहीं. दहा राजांनीं मिळून सुदासाविरुद्ध सर्व बाजूंनीं रान उठविलें होतें, इतकाच त्या वचनाचा अर्थ दिसतो. ७–३३–५ या स्थळींहि 'उत् द्याम् इव इत् तृष्णजो नाथितासो अदीधयुः दाशराज्ञे वृतासः,।' म्हणजे 'तृष्णेनें व्याकुळ झालेले लोक ज्याप्रमाणें आकाशाकडे दृष्टि लावितात त्याप्रमाणें दशराजांनीं वेढलेल्या लोकांची अवस्था झाली होती,' असें वर्णन आलें आहे. तरीसुद्धां एकंदर परिस्थितीचा विचार केला असतां सुदाससेनेला पक्का वेढा बसला असावा, असें दिसत नाहीं. सुदास आणि चायमान या उभयतांच्या सैन्यामध्यें परुष्णी नदीचा विस्तृत खंदक होता. ते दिवस शरदृतूचे असल्यानें नदीला पाणीहि पुरेसें होतें. त्यामुळें त्या दोघां प्रतिस्पर्ध्यांपैकीं एकालाहि शत्रूच्या विरोधाला न जुमानतां नदी उतरण्याचा धीर होत नव्हता. बलाबलाच्या मानानें सुदासाचें सैन्य चायमानाच्या सैन्यापेक्षां अगदीं कमी होतें. त्याला आपलें सारें सैन्य शत्रूच्या मुख्य सैन्यासमोर एकत्रित करावें लागलें होतें. उलटपक्षीं चायमानाच्या सैन्यांतील लहानमोठ्या टोळ्या दूरदूरच्या भागांतून नदी उतरून सुदाससेनेच्या पिछाडीला उपद्रव देत होत्या. पण मुख्य सैन्याला विरोध करण्याचें महत्त्वाचें कार्य विसरून त्या टोळ्यांच्या नादीं लागण्याची सुदासाची इच्छा नव्हती. आज नाहीं उद्यां, आपला इराणी

शत्रु इराणी डावपेंच लढवील आणि मग आपल्याला त्याचा संपूर्ण उच्छेद करण्याची संधि सांपडेल, अशी त्याला आशा वाटत असावी. सुदासाच्या मनांतील विचार अर्वाचीन वाचकांना समजण्याकरतां हा इराणी डावपेंच कोणत्या प्रकारचा होता, तें सांगितलें पाहिजे. पहिला ग्रीक इतिहास-लेखक हिरोडोटस् यानें इराणाच्या सम्राटांविषयीं असें लिहिलें आहे कीं ते पर्वतांतून नद्यांना धरणें बांधीत आणि पाण्याचे प्रवाह अडवून खोऱ्यांतील लोकांची शेती नष्ट करून त्यांना वठणीवर आणीत असत. कारण इराणांतील पुष्कळशी शेती ही कालव्यांवरच अवलंबून असते. ऋग्वेदांतून वारंवार इंद्रानें अहीला मारून नद्यांचे प्रवाह पुर्ववत् वहावयाला लाविले, असा उल्लेख येतो. याचा अर्थहि असाच लावावा लागतो. आहे म्हणजे पर्वतवासी जन, आपल्या पर्वतराजींतून वहाणाऱ्या नद्यांचे प्रवाह अडवून खोऱ्यांतील लोकांचें पाणी तोडूं शकत. यामुळें खोऱ्यांतील लोकांना अहींना मारून पाण्याचे प्रवाह मोकळे करावे लागत. जेथें पाण्याचे प्रवाह पूर्णपणें अडविण्याइतके लहान नसत, तेथें त्या पाण्याला वाट काढून देण्याचे प्रयोग केले जात. ऐतिहासिक काळांतील एक इराणी सम्राट् कायरस अगर कुरु यानें याचप्रमाणें नदीचा ओघ वळवून बाबिलोन राजधानी जिंकल्याची कथा इतिहासांत प्रसिद्ध आहे. इराणासारख्या कमी पावसाच्या देशांत असले प्रयोग यशस्वी करून दाखविणें फारसें अवघड नव्हतें पण तोच प्रयोग हिंदुस्थानांत उच्छृंखल सरितांवर करणें किती धोक्याचें होतें, याची चायमानाला यथार्थ कल्पना आली नाहीं. याच घटनेला उद्देशून वसिष्ठानें उपहासानें म्हटलें आहे.

दुराध्यो अदितिं स्रेवयन्तो अचेतसो विजगृभ्रे परुष्णीम् ।
मह्नाविव्यक्पृथिवीं पत्यमानः पशुः कविरशयत् चायमानः ॥
(७-१८-८)

'मनांत दुष्ट हेतु धारण करणाऱ्या मूर्खांनीं अमर्याद अशा परुष्णी नदीचें तीर फोडिलें. तेव्हां तिचें पाणी सर्वत्र पसरलें आणि त्या जलौघापासून पळून जाऊं पाहणारा कवि चायमान पशुप्रमाणें बुडून मेला.' या ऋचेंत परुष्णीला अदिति हें विशेषण वसिष्ठानें हेतुपुरःसर लाविलें आहे. जरथुस्त्राच्या काळीं इराणांतील सर्व नद्यांमध्यें दिति नदी ही अत्यंत पवित्र मानली जात असे. याकरतां 'तुमच्या दितीप्रमाणें आमच्या नद्या मानवी इच्छेला वश होणाऱ्या नाहींत,' हें सुचविण्याकरतां वसिष्ठानें आदिति या विशेषणाचा उपयोग केला आहे. अदिति शब्दाचा येथें विशेष अर्थानें उपयोग केला आहे, हें निघंटूच्या चौथ्या अध्यायांतील विशेषार्थक शब्दांत त्याचा समावेश झाला आहे यावरून कळेल.

परुष्णीचें तीर चायमानानें फोडिलें, तें अर्थात् आपल्याच बाजूचें फोडिलें. या तीर फोडण्याची शत्रूला पुरती माहिती लागूं नये म्हणून हा प्रयोग बहुधा रात्रींच्या वेळींच झाला असावा. ही तीर फोडण्याची क्लृप्ति चायमानाला सुचली, त्या अर्थीं नदीतीराशेजारची भूमि त्या तीरापेक्षां खोलगट जागेंत असली पाहिजे, हें उघड आहे. अशा प्रकारें विचार केला असतां सहज कळून येतें कीं अपरात्रीं तीर फोडिल्यानें पाण्याचा लोंढा जो पसरला, तो त्या इराणी सम्राटाच्या शिबिरांतच शिरला आणि त्यामुळेंच त्याच्या साऱ्या सैन्याची अकस्मात् त्रेधा झाली.

या साऱ्या परिस्थितीची सुदासाला अर्थात् अतिशय चांगली कल्पना होती. शत्रूच्या हालचालींचा सुगावा लागतांच त्यानें आपलें सैन्य सज्ज करून निर्भयपणें स्वतःचा घोडा नदींत घातला.

वसिष्ठानें म्हटलें आहे, 'अर्णांसि चित्रप्रथाना सुदास इन्द्रोगाधान्यकृणोत् सुपारा।' खालच्या भागांत पाणी वाढत असतांनाच वरच्या भागांत नदीला जो गचक्या उतार होता तो अधिकाधिक सुकर होऊं लागला. त्यामुळें 'आशुश्चनेभिपित्वंजगाम सुदासः।' म्हणजे

सुदासाचा घोडा इष्ट स्थळीं पोहोंचला. इतकें झालें तरी खरी कसोटी पुढेंच होती. कारण परतीरावर चायमानाच्या साम्राज्यांतील प्रख्यात पहाडी लढवय्ये जे भेद, ते त्या तीराचें रक्षण करीत होते. ७-३३-३ या स्थळीं वसिष्ठपुत्रांनीं म्हटलें आहे, 'एव इत् नु कं सिंधुम् एभिः ततार एव इत् नु कं भेदं एभिः जघान। एव इत् नु कं दाशराज्ञे सुदासम् प्र आवत् इंद्र ब्रह्मणा वो वसिष्ठः॥' म्हणजे 'वसिष्ठाच्या स्तोत्रांमुळेंच इंद्रानें सुदासाला नदीपार नेलें आणि भेदाला मारिलें.' पुढें ८३ व्या सूक्तांतहि 'इंद्रावरुणा वधनाभिः अप्रतिभेदम् वन्वन्ता प्रसुदासम् आवतम्।' असा भेदांचा उल्लेख आला आहे. यावरून त्या लढाईत सुदासाची भेदाशींच काय ती निकराची काटाकाटी झाली, असें दिसून येतें.

या वेळीं सुदासाप्रमाणेंच पुरुकुत्सानेंहि ससैन्य नदी ओलांडली असावी, असें अगस्त्याच्या १-१७४-२ या ऋचेवरून दिसून येतें.

दनो विश इंद्र मृध्रवाचः सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दर्त्।
ऋणोरपो अनवद्यार्णा यूने वृत्रं पुरुकुत्साय रन्धीः॥

परुष्णीच्या लढाईत नदी ओलांडल्यावर शत्रूच्या सात पुरांचा म्हणजे छावण्यांचा विध्वंस झाल्याचा वसिष्ठसूक्तांतून उल्लेख आला आहे. त्याच सात पुरांच्या विध्वंसाचें कर्तृत्व या ठिकाणीं अगस्त्यानें पर्यायानें पुरुकुत्साकडे दिलें आहे; आणि नदीचें तीर फोडिलें, तेव्हां तरुण अशा पुरुकुत्सानें वृत्रांचा संहार केला, असें सांगितलें आहे. पहिल्या मंडलाच्या ६३ व्या सूक्तांत 'त्वं ह त्यद् इंद्र सप्त युध्यन् पुरो वज्रिन् पुरुकुत्साय दर्दः।' असें स्पष्टच सांगितलें आहे. सहाव्या मंडलांतील विसाव्या सूक्तांतहि 'सप्तयत्पुरः शर्म शारदीर्दर्द् हन् दासीः पुरुकुत्साय शिक्षन्।' अशी पुरुकुत्साच्या पराक्रमाची पुनरावृत्ति केली आहे. या निरनिराळ्या स्थळीं

सप्त पुरांचा विध्वंस करण्याचें श्रेय पुरुकुत्साला दिलें असल्यानें वसिष्ठांच्या विजयसूक्तांतील 'इंद्रः पुरः सहसा सप्त दर्दः।' हा अनामिक उल्लेखहि पुरुकुत्सालाच उद्देशून असला पाहिजे, असें साधार म्हणतां येतें.

पार्थव सम्राट् कवि चायमान हा जेव्हां परुष्णीचें तीर फोडण्याच्या मूर्खपणाबद्दल देहांत प्रायश्चित्त घेत होता आणि सुदासपुरुकुत्स हे भेदवृत्रांचा संहार करण्यांत गुंतले होते, अशा वेळीं तुर्वशांनीं परुष्णीचा लोंढा अनावर होण्यापूर्वींच पलायन करून आपला प्राण वांचविला. तुर्वश हें इंद्रावर विश्वास ठेवणारे असल्यानें वांचलें, असें वसिष्ठानें सांगितलें आहे. त्यांचें प्रथमपासूनच सुदासाशीं सूत्र असावें, अशी शंका येते. तुर्वश पळून गेले तरी अनुद्रुह्यु पुरांत सांपडलेच.

अध श्रुतं कवषं वृद्धम् अप्सु अनुद्रुह्युं निवृणक् वज्रबाहुः।

या ऋचार्धांतील श्रुत आणि वृद्ध या नांवांची व्यवस्था काय करावी, याविषयीं मुळींच कल्पना चालत नाहीं. कविकुळांतील लोकांना इराणांत रुवप्प म्हणत असत. हे कवष स्वतः सम्राट् चायमानाच्या शरीरसंरक्षकांपैकींच असणार, हें उघड आहे. त्यामुळें त्यांना आपल्या कुळाच्या नेत्यासहच जलसमाधि मिळणें स्वाभाविक आहे. त्यांच्या व्यतिरिक्त अनु आणि द्रुह्यु याहि कुळांना परुष्णी नदीनें जलसमाधि दिली. 'नि गव्यवो अनवो द्रुह्यवश्च षष्टिः शता सुषुपुः षट् सहस्रा।' म्हणजे गाईंची इच्छा करणारे सहस्रावधि अनुद्रुह्यु नदींत बुडाले, असें वसिष्ठाचें म्हणणें आहे. म्हणजे स्वारी करणाऱ्या सैन्यांतील अनुद्रुह्यु आणि कवि अथवा भृगु या तीन कुळांची परुष्णीच्या लोंढ्यामुळें पराकाष्ठेची हानि झाली. तुर्वश वांचले, पण ते परत या लढाईत समाविष्ट झाले नाहींत. एकट्या पुरूंनीं मात्र आपले लोक बचावून नेले, इतकेंच नव्हे तर सुदासाशीं आपलें वैरहि पुढें चालविलें. त्यांना उद्देशून वसिष्ठानें म्हटलेंच आहे, 'जेष्म पुरुं विदथे मृध्रवाचम्' म्हणजे 'इतःपर संमुख युद्धांत आम्ही पुरूंना जिंकूं.'

पुरूचे निकटसंबंधी जे वैकर्ण तेहि परुष्णीच्या पुरांत सांपडले नाहींत. पण सुदासानें त्यांचा मोठ्या प्रमाणावर संहार केला. वैकर्णांना मी पुरूचे निकटसंबंधी कां म्हणतों याचीं कारणें सांगितलीं पाहिजेत: पहिलें कारण असें कीं प्राचीन चरित्रकोशांत अवघा एकच विकर्ण आढळतो आणि तोहि पुरुकुलोत्पन्न धृतराष्ट्राचा पुत्र आहे. दुसरें असें कीं वैकर्ण हें नांव अवेस्त्यांत ज्यांना वेकर्न आणि असीरियन लेखांत ज्यांना विकन अशी संज्ञा दिली आहे त्या वृकांच्या टोळीपैकीं होतें. धृतराष्ट्राचा एक पूर्वज शांतनु याला वेदांत औलान म्हणजे उलाचा अर्थात् वृकाचा वंशज म्हटलें आहे. धृतराष्ट्राचा वृकोदर पुतण्या तर सर्वच वाचकांना स्मरत असेल. या साऱ्या नांवांवरून पुरु आणि वृक यांचे परस्परसंबंध कळून येतात. वैकर्णांच्या संहारासंबंधीं वसिष्ठांनीं पुढील माहिती पुरविली आहे.

एकंच विंशतिंच श्रवस्या वैकर्णयोः जनान् राजा न्यस्तः ।
दस्मो न सद्मन् नि शिशाति बर्हिः शूरः सर्गम् अकृणोत् इंद्र एषाम् ॥

या ऋचेचें श्रुतिबोधकारांचें भाषांतर सर्वांत समर्पक आहे: 'कीर्तिलाभाच्या इच्छेनें त्या राजानें वैकर्ण प्रांतांतील वीस वीस लोकांच्या टोळ्यांना अशा रीतीनें छाटून टाकलें कीं, जणों काय अत्यंत कुशल अशा ऋत्विजानें यज्ञगृहांत दर्भांच्या जुड्याच कापून टाकल्या आहेत.'

वसिष्ठाच्या सूक्तांतील पुष्कळसें वर्णन वक्रोक्तिप्रचुर असल्यानें ज्यांना स्वभावोक्तिव्यतिरिक्त इतर कोणताहि अलंकार समजत नाहीं, अशा लोकांना त्याच्या वर्णनाचा खरा रोख समजणें दुष्कर होतें. अशाच एका ऋचेचा येथें थोडा विचार केला पाहिजे.

आवदिंद्रं यमुना तृत्सवश्च प्रात्र भेदं सर्वताता मुषायत् ।
अजासश्च शिग्रवो यक्षवश्च बलिं शीर्ष्याणि जभ्रुः अश्व्यानि ॥

इंद्र यमुना आणि तृत्सु या लोकांवर जेव्हां संतुष्ट झाला, तेव्हांच त्यानें भेदाचें ऐश्वर्य हिरावून घेतलें. अजास, शिग्रु आणि यक्षु यांनीं जणूं कांहीं इंद्राला भेट म्हणून आपल्या घोडदलांतीण घोड्यांचीं शिरें धाडून दिलीं. ही अर्थात् त्यांच्या घोड्यांचा जो भीषण संहार झाला त्यावर वसिष्ठानें केलेली उत्प्रेक्षा आहे. पण तिचा बहुतेक विद्वानांनीं शब्दशः अर्थ घेतला आहे.

आतांपर्यंत परुष्णीच्या तीरावरील निर्वाणीच्या लढाईतल्या बहुतेक साऱ्या ज्ञात घटनांचा उल्लेख झाला. या लढाईनंतर सप्त पुरांचा विध्वंस केल्याचा जो उल्लेख आढळतो, याचा अर्थ मी इतकाच समजतों कीं शत्रूंच्या सात छावण्यांचा पुरुकुत्सानें नायनाट केला. या लढाईनंतरची महत्त्वाची घटना म्हणजे पुरूंचा पाठलाग होय. या घटनेसंबंधींचे दोन उल्लेख मला वसिष्ठाच्या अग्निसूक्तांतून आढळले आहेत. यांपैकीं आठव्या सूक्तांतील उल्लेखाचा प्रथम विचार केला पाहिजे.

प्र प्रायम् अग्निः भरतस्य शृण्वे वि यत् सूर्यः न रोचते बृहत् भाः।
अभि यः पूरुं पृतनासु तस्थौ द्युतानः दैव्यः अतिथिः शुशोच॥
(७-८-४)

या वचनांत 'रवीप्रमाणें प्रकाशणाऱ्या भरतांच्या अग्नीनें संग्रामाच्या क्षणीं पुरूंना सर्व बाजूंनीं वेढिलें असल्या'चा उल्लेख आला आहे. याच घटनेची अधिक माहिती वसिष्ठाच्या सहाव्या सूक्तांत आली आहे, असें मला वाटतें.

निरुध्य नहुषः यह्वः अग्निः विशः चक्रे बलिहृत सहोभिः।
(७-६-५)

या ठिकाणीं अग्नीनें नहुषाच्या प्रजेला वेढून बलिहृत केल्याचा म्हणजे खंडणी द्यावयाला लाविल्याचा उल्लेख आला आहे. हें विधान

दाशराज्ञयुद्धानंतरच्या शरणागतीलाच पूर्णपणें लागू पडतें. कारण या युद्धांत नहुषाच्या कुलांतील पांचहि टोळ्या समाविष्ट झाल्या होत्या. वरील विवेचनांत यदुतुर्वशद्रुह्युअनुपुरु यांपैकीं पहिल्या यदूंचा उल्लेख आला नाहीं, हें खरें. पण ऋग्वेदांत यदुतुर्वशांना बुडत असतांना इंद्रानें वांचविल्याचे जे उल्लेख ठिकठिकाणीं आढळतात, ते परुष्णी-तीरावरील घटनेलाच अनुलक्षून असावेत, असें मानण्याला अनेक कारणें आहेत. ती कल्पना खरी न मानली तरी सर्व साहसांमध्यें तुर्वशांशीं सहकार्य करणारे यदु सुदासावरील स्वारींतच मागें राहिले होते, असें समजणें चूक होईल. तेव्हां अग्नीनें नहुषाच्या प्रजेला वेढून खंडणी देऊन सुटका करून घ्यावयाला लाविलें, या उल्लेखाचा संबंध दाशराज्ञयुद्धाच्या परिसमाप्तीकडे लावण्यांत कोणताहि दोष नाहीं. वसिष्ठाच्या या वचनाचा इराणाच्या इतिहासाच्या दृष्टीनेंहि थोडा विचार करणें आवश्यक आहे. इराणी सम्राटांच्या शिलालेखांचा ज्यांना थोडाफार परिचय आहे त्यांना माहीत आहे कीं ते सम्राट स्वतःला '**मलकान् मलका ऐलान् ओ अनिलान्**' आणि '**नख नखान्**' अशा पदव्या लावीत असत. यांपैकीं पहिल्या पदवीचा अर्थ ऐल आणि अनैल यांचे सम्राट असा होतो. दुसऱ्या उपाधीचा अर्थ राजाधिराज असा आहे. वैदिक नहुस् शब्दाचा इराणांत नखुस् असा अपभ्रंश होऊन पुढें त्याचें नख असें रूपांतर झालें. हा शब्द ते राजा या अर्थानें वापरीत असत. पहिल्या पदवीच्या ऐवजीं अनेक शिलालेखांतून '**मलकान् मलका ऐरान् ओ अनिदरान्**' असाहि उल्लेख आढळतो. पण त्यामुळें या विवेचनाला उलट पुष्टिच मिळते; कारण ऐल आणि ऐर हे शब्द समानार्थकच आहेत, हें पुराणांच्या अभ्यासकांना माहीत आहेच. यांतील ऐरान् शब्दापासूनच अर्वाचीन इराण शब्द उद्भवला आहे. इराणाचे सम्राट आपल्याला ऐलांचे अधिपति म्हणवीत होते, हें कळलें म्हणजे ते आपल्याला नहुस् ही पदवी कां लावीत होते हेंहि कळून येतें. येथें प्रश्न असा उपस्थित होईल कीं वेदकाळीं नहुस् हा

शब्द सम्राट अर्थानें वापरला जात होता असें म्हणण्याला आधार काय ? असा एक आधार आठव्या मंडलांतील ४६ व्या सूक्तांत आढळून येतो. या सूक्तांत कानीत पृथुश्रवा या राजाची ऋग्वेदांतील सर्वांत विस्तृत अशी दानस्तुति आली असून तेथें त्या राजाला नहुष या नांवानेंहि संबोधिलें आहे. ऋग्वेदांत जेथें जेथें नहुष किंवा नहुस् असा शब्द येतो तेथें तेथें त्याचा नेमानें इराणाचा सम्राट असा अर्थ होतो.

———

# ऋग्वेदसमाप्तीचा काळ

ऋग्वेदाच्या समाप्तीचा काळ ख्रि. पू. १००० या सुमाराला असावा, अशी समजूत स्वतःला भाषाशास्त्रज्ञ म्हणविणाऱ्या विद्वांनांमध्यें अलीकडे दृढमूल होऊं लागली आहे. या महापंडितांना हीं गोष्ट माहीत नाहीं कीं आपण ज्याला ऋग्वेदांतील सर्वांत अर्वाचीन सूक्तांच्या रचनेचा काळ समजतों, त्या काळीं या भारतवर्षांत भारताचीहि रचना होऊन गेली होती. ऋग्वेदासंबंधीं सर्वस्वीं अनैतिहासिक मतें प्रतिपादिणाऱ्या या पंडितांना महाभारताचा संपूर्ण विसर पडलेला असतो. किंवा विशिष्ट विषयाला सर्वस्वीं वाहून घेण्याच्या त्यांच्या विचित्र पद्धतीमुळें त्यांनीं इतर आनुषंगिक विषयांचा सामान्य परिचयसुद्धां करून घेतलेला नसतो. या एकांगी व्यासंगामुळेंच त्यांच्या हातून असल्या हास्यास्पद चुका घडत असतात. महाभारताचा पहिला आराखडा बुद्धाच्या पूर्वींच लिहिला गेला होता, असें डॉ. बेलवलकरांनीं 'महाभारताचा उपसंहार' या ग्रंथाच्या परीक्षणप्रसंगीं प्रतिपादिल्याचें मला स्मरतें. आज त्यांचें मत काय आहे तें मला माहीत नाहीं. महाभारत बुद्धापूर्वींच नव्हे तर हिंदुस्थानांत लिच्छवींचें आगमन होण्यापूर्वींच रचिलें गेलें होतें, असें म्हणण्याला महाभारतांत आधार आहे. बुद्धाच्या काळीं पूर्वहिंदुस्थानांत लिच्छवींचें किती माहात्म्य होतें, हें बुद्धकाळाच्या साऱ्या अभ्यासकांना माहीत असेलच, पण महाभारतांत त्यांचा नुसता नामनिर्देशसुद्धां आढळत नाहीं. सभापर्वांतील भीमाच्या पूर्वदिग्विजयाच्या वर्णनांत शाक्यकुलांतील मल्लांचा उल्लेख आला असूनसुद्धां लिच्छवींचा उल्लेख आलेला नाहीं. विराटपर्वांतहि अज्ञातवासाचा काळ कंठण्याकरतां योग्य देश कोणता, याची चर्चा चालूं असतांना 'मल्लानां नवराष्ट्रेच' असा उल्लेख आलेला

आहे. पण येथेंसुद्धां लिच्छवींच्या अस्तित्वाची महाभारतकारांना जाणीव असल्याचीं लक्षणें दिसत नाहींत. या अनुल्लेखांवरून लिच्छवींना अनुल्लेखानें मारण्याचा महाभारतकारांचा हेतु होता, असलीं अति आधुनिक अनुमानें काढून श्री. श्यामाचरण चक्रवर्तीनीं तीं 'इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली'च्या १९३३ जूनच्या अंकांत प्रसिद्धहि केलीं आहेत. महाभारतांतील अनुल्लेखांचा खरा अर्थ असा होतो कीं त्या महाग्रंथाच्या रचनाकाळीं आर्यावर्ताला लिच्छवी या मोंगल टोळ्यांचा अजून परिचय झाला नव्हता. 'मल्लानां नवराष्ट्रंच' या वचनावरून आणि महाभारतकाळीं आर्यांना मल्लांचें जें भय वाटत होतें त्यावरूनहि मल्लांचा तेव्हां भारतांत नवीनच प्रवेश झाला होता, असें स्पष्ट दिसतें. बुद्धकाळीं लिच्छवींचा भाग्यरवि मध्याह्नापासून ढळून अस्ताचलाकडे झुकूं लागला होता. तेव्हां बुद्धजन्माच्या आधीं कित्येक पिढ्या त्यांचा भारतांत प्रवेश झाला असला पाहिजे. बुद्धाचा जन्मकाल ख्रि. पू. ६२० मानला तर ख्रि. पू. ८०० ते ७५० या अवधींत केव्हां तरी लिच्छवींनीं येथें आपलें गणराज्य स्थापिलें असलें पाहिजे. सर्व शाक्य लोक मोंगोलियन वंशाचे होते, असें कै. रमेशचंद्र दत्त आणि कै. व्हिन्सेंट स्मिथ यांच्याप्रमाणेंच माझेंहि मत आहे. ही वस्तुस्थिति दृष्टीआड करून कलकत्ता विद्यापीठांतील विद्वानांनीं बौद्धकालाचा इतिहास पूर्णपणें विपर्यस्त करून ठेवला आहे. असो, लिच्छवींच्या भारतप्रवेशापूर्वींच महाभारताची रचना झाली होती तर तिचा काळ ख्रि. पू. ८०० ते ख्रि. पू. १००० या दोनशें वर्षांतच केव्हां तरी असला पाहिजे, हें उघड आहे. महाभारतांत सर्वत्र वेदांग ज्योतिषाची पंचांगपद्धति वापरली आहे. तेव्हां त्या ज्योतिषाच्या रचनेपूर्वीं महाभारताची पहिली प्रत लिहिली गेली नसेल. या विवेचनावरून वेदांग ज्योतिषाच्या रचनेपासून मल्लांच्या भारतप्रवेशापर्यंतच्या काळांत महाभारताची रचना झाली असावी, असें सकृद्दर्शनीं तरी म्हणतां येईल.

महाभारताच्या रचनाकाळीं भारतीय आर्यांना पूर्वहिंदुस्थानांत नवीनच घुसलेल्या मांगोलियन टोळ्यांचें महद्भय उत्पन्न झालें होतें, ही वस्तुस्थिति अर्वाचीन भारताभ्यासकांच्या लक्ष्यांत आली तरच त्यांना त्या महान् ग्रंथाच्या रचनेचें मर्म समजणें शक्य होईल. महाभारतांत दुर्योधना-व्यतिरिक्त पांडवांच्या दुसऱ्या दोघांतिघां शत्रूंना विशेष महत्त्व दिलें आहे. यांपैकीं जरासंधाचें भय साऱ्याच उत्तरापथाला भोंवत होतें. कीचकानें आपल्या बंधूंच्या सहायानें मत्स्य देशाला ग्रासिलें होतें. या दोघांच्या इतकेंच किरातांचेंहि तत्कालीन आर्यांना भय वाटत असलें पाहिजे, त्यावांचून कांहीं किरातार्जुनीय युद्धाला महाभारतकारांनीं इतकें महत्त्व दिलें नसतें. या नांवांसंबंधीं वाल्टर हॅमिल्टनच्या ' जिऑग्रॅफिकल, स्टॅटिस्टिकल अँड हिस्टॉरिकल डिस्क्रिपशन् ऑफ इंडिया ' या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडांतील ६६८ पानावर अशी माहिती आढळते कीं, हीं सारीं नेपाळांतील आदिवासी लोकांच्या टोळ्यांचीं नांवें आहेत. यावरून असें अनुमान निघतें कीं मल्ल, कीचक, जरा, किरात इत्यादि टोळ्यांच्या संकटापासून आत्मसंरक्षण करून घेण्याकरतां भारतीय आर्यांना एके काळीं आपल्या पश्चिमेकडील शत्रूंशीं समेट करावा लागला असला पाहिजे. वरील नांवांपैकीं कीचक आणि किरात हीं एकाच टोळीचीं दोन नांवें आहेत, इतकें सांगितलें म्हणजे त्यांच्याविषयीं अधिक विवेचन करावयाला नको. पण एके काळीं जरा या टोळीचा भारतीय आर्यांना अतिशय उपद्रव झाला होता, ही कल्पना इतिहासाच्या अभ्यासकांना नवीनच असल्यामुळें तिच्यासंबंधीं दोन शब्द लिहिले पाहिजेत. मथुरेच्या रक्षणाकरतां कृष्णानें जरासंधाशीं म्हणजे जरा लोकांच्या संघाशीं निकराचें युद्ध केलें. या युद्धांत पराजित झाल्यामुळें त्याला पश्चिमकिनाऱ्यावरील द्वारकेंत आश्रय घ्यावा लागला. कृष्णाचा अंतहि जरा जातीच्या एका व्याधाकडूनच झाला. कृष्णचरित्रांतील या ढोबळ गोष्टींची आमच्या चिकित्सकगुरुवांना जाणीव नसते. त्याप्रमाणेंच जरासंध या नांवांतील संघा शब्दाचा अर्थ

संघ असाहि होऊं शकतो, याची त्यांना कल्पना नसते. जरा, कीचक, किरात, मल्ल या साऱ्यांशीं भारतीय आर्यांचीं एकाच काळीं युद्धें झालीं असतील, असें मला म्हणावयाचें नाहीं. हीं युद्धें भिन्न भिन्न काळीं झालीं असतील, आणि शेंकडों वर्षें चाललीं असतील. माझें म्हणणें इतकेंच कीं या युद्धांच्या काळांतच महाभारताचें कथानक रचिलें गेलें असावें. ही कल्पना इतर माहितीशीं विसंगत नाहीं उलट तीमुळें विद्यमान महाभारताच्या रचनेवर उत्कृष्ट प्रकाश पडतो.

मोंगोलियन टोळयांच्या टोळधाडीपासून आत्मसंरक्षण करून घेण्याकरतां भारतीय आर्यांनीं जरथुस्त्री पंथाच्या उदयामुळें आपल्या समाजांत जो अंतःकलह उत्पन्न झाला होता, तो मिटविण्याचा प्रयत्न केला असलाच पाहिजे. या प्रयत्नांचा दृश्य परिणाम मूळ भारतकथेचें सध्यां जें इराणीकरण झालें आहे, त्यांत दिसून येतो. भारतकथेचें इराणीकरण झाल्याची कल्पना वाचकवर्गाला अगदीं अपरिचित आहे. पण कै. डॉ. सुकथनकरांच्या कृपेनें महाभारताचें केव्हां तरी भार्गवीकरण झाल्याची वार्ता आतां विद्वानांना लागली आहे. याच माहितीचीं त्यांनीं जर थोडीफार चिकित्सा केली असती तर त्यांना असें कळून आलें असतें कीं भार्गवीकरणाच्या पूर्वींच भारताचें इराणीकरण झालें होतें. इतकेंच नव्हे तर त्या इराणीकरणामुळेंच भृगूंच्या सारख्या इराणी कुळाकडे महाभारताच्या संरक्षणाचें आणि संवर्धनाचें दायित्व गेलें होतें. येथें कोणी असा प्रश्न काढील कीं भृगुकुल इराणी होतें, असें म्हणण्याला आधार काय? वास्तविक पाहतां चायमानाच्या सैन्यांत भृगूंचा समावेश झाला होता, हा यापूर्वींच आलेला पुरावा वरील विधानाला पुरेसा आहे. पण तेवढ्यानें आमच्या आधारलोलुप आक्षेपकांचें समाधान व्हावयाचें नाहीं, याकरतां आणखी कांहीं आधारांचा तरी येथें उल्लेख केला पाहिजे. यापैकीं पहिला महत्त्वाचा आधार हा आहे कीं जरथुस्त्राच्या गाथांतून त्यानें आपले प्रतिपक्षी

जे कविकुळांतील लोक त्यांच्यावर पर्यायानें मद्यासक्तीचा आरोप केला आहे. असन्मार्गाला लागलेल्यांना गेरेह्मा (अर्थात् ब्रह्मा वसिष्ठ) आणि कविकुळांतील लोक यांचा आश्रय करून बल प्राप्त होईल असे मानणें म्हणजे मद्यपानानें बल प्राप्त होतें असें मानण्यासारखेंच आहे, (गाथा ३२–१५) असे स्वतः जरथुस्त्राचेच उद्गार आहेत. ययाति कवीचा जामाता झाल्याची जी कथा व्यासांनीं लिहिली आहे, तिच्यांत कवि शुक्राच्या मद्यासक्तीचें जें चित्र रेखाटलें आहे त्याचा भारताच्या वाचकांना विसर पडणें अशक्य आहे. 'कवीनां उशना कविः' अशी ज्या उशना कवीची महती भगवद्गीतेनें गायिली आहे, त्या उशना कवीचा उल्लेख अवेस्त्यांत अनेक ठिकाणीं आला आहे. भृगुकुलांतील एक प्रख्यात ऋषि च्यवन हा इराणी असल्याचा उल्लेख यापूर्वीच येऊन गेला आहे. त्या च्यवनाचा एक वंशज ऋचीक भारतांत प्रसिध्द आहे. पण हें व्यक्तिनाम आहे कीं नाहीं, याविषयीं शंका येते. कारण रॉलिन्सनच्या प्राचीन इराणाच्या इतिहासांत ऋशीख हें इराणांतील पुरोहितांपैकीं एका विशिष्ट वर्गाचें नांव असल्याची माहिती आढळते. वास्तविक पाहतां कविकुळांतील इतक्या लोकांचे उल्लेख अवेस्त्यांत आले आहेत कीं त्यांची नुसती नामावलीसुद्धां या लहानशा प्रबंधांत देणें अवघड आहे. कवि आणि भृगु हे इराणी नव्हते, असें प्रतिपादिण्याचें साहस कोणी केल्यास त्याला उत्तर देण्याकरतां तो उद्योग करतां येईल.

आतां महाभारतावर इराणी कल्पनांची छाया कशी पडली आहे, हें विशद करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. येथें पहिलीच गोष्ट ही सुचते कीं पृथ्वीनें गोरूपानें विधात्याकडे जाऊन आपल्या रक्षणाकरतां प्रार्थना करण्याची कल्पना मूळची जरथुस्त्राची आहे, गोभक्षक वेदकालीन आर्यांची नव्हे. भूमीला गाय समजण्याची कल्पना संस्कृतांत अथर्ववेदांतील भृगुविषयक ब्रम्हगवी या सुप्रसिद्ध सूक्तांतच प्रथम आली आहे. महाभारतांतील 'अवतारनिश्चय' या अध्यायांत पृथ्वीनें ब्रह्मदेवाची

गोरूपानें प्रार्थना केल्याची जी कथा आली आहे, ती जरथुस्त्री पंथाच्या अनुकरणानें आली आहे, याविषयीं संशय नाहीं.

महाभारताच्या रचनेवर जरथुस्त्री विचारसरणीची छाप किती पडली आहे, हें जरथुस्त्राच्या ४८ व्या गाथेच्या पुढील सारांशावरून सहज समजून येण्याजोगें आहे. याकरतां एर्वाड शेरियारजी दादाभाई भरूचा यांच्या 'झोरोआस्ट्रियन रिलिजन अँड कस्टम्स' या प्रमाण ग्रंथांतून त्या गाथेचा पुढील सारांश उतरून घेत आहें.

(1) That at last truth shall overcome falsehood is a position upheld by Zoroaster. But his opponent denies it and asserts that the wicked Daevas are immortal and that whatever is is good. (2) Wherupon Zarathushtra earnestly inquires of Ahur Mazda, whether the fight of the twins, i. e. good and evil is to last eternally or ultimately shall have an end ? Whether the good will eventually overcome the evil or not ? Is the present form of life good ? (3) Are not the efforts of those who work on the lines of the mysterious words and who endeaver to resemble thee in their wisdom of good mind to be crowned with success at last ? (4) Is the doctrine of him, who sanctions both the good as well as the evil mind, speech and work, right ? Will not thy wisdom at last prevail ? The answer is supposed to be in support of Zoroastes's anticipations. ( 5 to 8 ) Then as a means to exepedite this much wished for result, viz. the final and permanent victory of the good over evil, of order over disorder, certain Commands are given, the chief of them being the right governament of the good, just and the righteous persons and the overthrow of those of the controry qualities ? ( 9 to 11 ) येथला थोडा अल्पमहत्वाचा भाग मानला म्हणजे महाभारत-कथेच्या दृष्टीनें अतिशय

महत्त्वाचें असलेलें पुढील वाक्य भेटतें. ' Here again the prophet earnestly longs for the suppression of the evil religion of his opponents such as the Karapans, ths Angirasas and the bad governors of Countries ? '

वरील उताऱ्याचें तात्पर्य असें कीं सु आणि कु यांच्या सुदीर्घ युध्दांत सुपक्षाचा जय व्हावा असें वाटत असल्यास सद्गुणी लोकांना सत्ता मिळवून देण्याचें आणि दुर्गुणी लोकांना अधिकारभ्रष्ट करण्याचें कर्तव्य प्रत्येकानें बजाविलें पाहिजे. बहुधा हें कर्तव्य बजावण्याकरतांच जरथुस्त्रानें या गाथेंत आपले प्रतिपक्षी जे कृप आणि आंगिरस, त्यांच्या धर्माचा नाश करण्याची आणि दुष्ट राज्यकर्त्यांचा नायनाट करण्याची अहुरमज्दापाशीं प्रार्थना केली आहे! या ठिकाणीं मूळ गाथेंत दुष्ट राज्यकर्त्यांना उद्देशून दुश् क्षथ्र हाच शब्द वापरला आहे. या शब्दाचेंच संस्कृत रूप दुश्शासन होय! या दुश्शासनाप्रमाणेंच ज्या कृप आणि आंगिरस कुलांविषयीं जरथुस्त्रानें तीव्र द्वेष व्यक्त केला आहे, त्यांच्या प्रतिनिधींचीं चरित्रेंहि प्रचलित महाभारतांत काळींकुट्ट करून टाकिलीं आहेत. संस्कृतज्ज्ञांमधील डॉ. शेंडे नांवाच्या एका आंकडेशास्त्रज्ञांनीं भारतांत आंगिरसांचे उल्लेख सर्वांत अधिक आढळतात. तेव्हां भृगुंप्रमाणेंच आंगिरसांनींहि महाभारताला त्याचें सध्यांचें स्वरूप प्राप्त करून देण्यांत भाग घेतला असावा, अशी कल्पना केली आहे. या विद्वद्वर्यांच्या लक्ष्यांत ही एकच गोष्ट आली नाहीं कीं सौप्तिक पर्वांतील अघोर कर्म आणि त्या अघोर कर्माबद्दल आंगिरसकुलोत्पन्न अश्वत्थाम्याला मिळालेलें प्रायश्चित्त हा कथाभाग आंगिरसकुळांतील लेखकांनीं महाभारतांत समाविष्ट केला, असें समजणें सर्वस्वीं हास्यास्पद आहे. हा कथाभाग वर उध्दृत केलेल्या गाथेच्या प्रभावामुळें महाभारतांत घुसडला गेला असावा, अशी शंका येते. वास्तविक पाहतां भीमदुर्योधनांच्या युध्दानंतर भारतीय युध्दाची समाप्ति होणें स्वाभाविक

आहे, आणि द्रोणपर्वांत एकवार नारायणास्त्र निष्फल झाल्यानंतर सौप्तिक पर्वांत तेंच अस्त्र त्याच किंवा दुसऱ्या नांवानें वापरणें अस्वाभाविक आहे. सौप्तिक पर्वांतील सर्वच नसला तरी पुष्कळसा भाग कृप आणि आंगिरस यांना वाईटपणा देण्याकरतां मागाहून वाढविलेला आहे, याविषयीं शंका नाहीं.

प्रत्यक्ष महाभारताच्या रचनेचा कोणी थोडाबहुत विचार केला तरी त्याला ही गोष्ट सहज कळून येण्याजोगी आहे कीं जरथुस्त्री पंथांतील ज्या कल्पनांचें आकर्षण सनातन वैदिक धर्माच्या अनुयायांना वाटत होतें, त्या साऱ्या कल्पना आपल्या पचनीं पाडण्याच्या उद्देशानेंच त्या महान् ग्रंथाची रचना केलेली आहे. जरथुस्त्री लोकांचें मुख्य तत्त्व म्हणजे स्पेंतमेन्यु आणि अंग्रमेन्यु यांच्यांतील चिरंतन कलह होय. याच चिरंतन कलहाचें वर्णन कौरवपांडवांच्या कलहाच्या रूपानें महाभारतकारांनीं केलेलें आहे. अवेस्ता ग्रंथांत स्पेंतमेन्यु आणि अंग्रमेन्यु यांना परस्परांचे जुळे भाऊ आणी वैरी असें म्हटलें आहे. तर महाभारतांत कौरवपांडवांना चुलतभाऊ अतएव दायाद बनविलें आहे. जरथुस्त्री लोकांच्या मताप्रमाणें सुमत् सूक्त आणि सुवृत्त अर्थात् सद्विचार सद्भाषण आणि सद्वर्तन या त्रयींत सर्व सुनीतीचा अंतर्भाव होतो; उलटपक्षीं दुर्नीतीचेहि दुर्मत, दुरुक्त आणि दुर्वृत्त म्हणजे दुर्विचार, दुर्भाषण आणि दुर्वर्तन असे त्रिविध प्रकार असतात. या त्रिविध दुर्नीतीचा जरथुस्त्री लोकांइतकाच आपल्याला तिटकारा आहे, हें त्यांना पटवून देण्याकरतां महाभारतकारांनी दुर्योधन आणि दुःशासन यांच्या चरित्रांचा भरपूर उपयोग केला आहे. धृतराष्ट्रसुताचें सुयोधन हें नांव जवळ जवळ लुप्त करून त्याला दुर्योधन बनविण्याचें कारण हेंच असलें पाहिजे. सुयोधनाप्रमाणेंच दुःशासनालाहि एखादें 'सु'नाम असणें अशक्य नाहीं. पण तशी शंकासुद्धां महाभारताच्या आजच्या वाचकांच्या मनाला शिवणें जवळ जवळ अशक्य होऊन बसलें आहे. धृतराष्ट्रसुताच्या नांवांत

केलेल्या परिवर्तनाप्रमाणेंच महाभारतकारांनीं युधिष्ठिराचेंहि नांव बदलून त्याला नित्योपयोगी धर्मराज हें नांव दिलें आहे. या एका नामकरणाबरोबर धर्मराजाचे शत्रु ते सारे अधर्मनिष्ठ अंग्रमेन्युचे हस्तक बनतात. जरथुस्त्राच्या गाथांतून त्यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे.

' Whatever may be the plots that the sinner makes against me let not the action of its flame burn me. ' ( गाथा ४६-८ )

या वाक्यांत लाक्षागृहाची सर्व कल्पना समाविष्ट झाली आहे, असें म्हणण्यांत यत्किंचितसुद्धां अतिशयोक्ति नाहीं. युद्धिष्ठिराला यमराजाचा पुत्र बनविण्यांतहि जरथुस्त्राच्या भक्तांना संतुष्ट करण्याचेंच धोरण दिसून येतें. यम हा इराणाचा पहिला राजा मानला जातो. यमराजाच्या राज्यांतील अन्न अक्षय होतें, असें अवेस्ता ग्रंथानें सांगितलें आहे.

' कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ' किंवा मोरोपंताच्या ' सर्वां पापांमध्यें हें मित्रद्रोह पाप मज मोठें ' या सारख्या वाक्यांतून महाभारतकारांनीं मित्रद्रोहाच्या पापाला जें महत्त्व दिलें आहे, तेंसुद्धां अवेस्त्याच्या अनुकरणानेंच दिलें असावेंसें वाटतें. अवेस्त्यांत मित्रद्रोहाच्या आणि वचनभंगाच्या पापावर एक स्वतंत्र प्रकरणच आलें आहे. या मित्रद्रोहावरील कटाक्षाचाच एक परिणाम म्हणजे मानवजातीचा मित्र जो कुत्रा त्याचा द्रोह करणाऱ्यांनाहि अवेस्त्यांत अतिशय कडक शिक्षा सांगितल्या आहेत; इतकेंच नव्हे तर कित्येकदां त्यांना मृत्युनंतर नरकवासहि नेमून दिला आहे. याच जरथुस्त्री भावनांना अनुलक्षून जनमेजयाच्या भावांनीं एका सारमेयाला मारिल्यामुळें त्याच्या यज्ञांत विघ्न उपस्थित झाल्याची कथा महाभारतांत आली आहे. भारतीयांप्रमाणेंच इराणी लोक जेव्हां महाप्रस्थानाप्रीत्यर्थ अल्बुर्ज पर्वतावर जात, तेव्हां त्यांना स्वर्गाची वाट दाखविण्याचें कार्य कुत्र्याचेंच असे. अवेस्त्यांतहि या कल्पनेचा

उल्लेख आला आहे. याच कल्पनेला अनुलक्षून महाभारतांतील महाप्रस्थानाच्या प्रसंगीं युधिष्ठिराबरोबर एक श्वान असल्याचें वर्णन कवीनें केलें. या श्वानाचा त्याग केल्यास मित्रद्रोह होईल, या भीतीनें त्याला टाकून स्वर्गांत जावयाचेंसुद्धां त्यानें नाकारिलें. युधिष्ठिराला धर्मराज बनविणाऱ्या ज्या कथा आहेत, त्या साऱ्या कुरुपांडव युद्धाला महाभारताचें स्वरूप प्राप्त झालें तेव्हांच्या आहेत, याविषयीं शंका नाहीं. याचा एक पुरावा असा कीं मूळ कथेंत पारशव विदुराला यमधर्माचा अवतार मानूनसुद्धां दासीपुत्र या नात्यानें धृतराष्ट्राच्या राजसभेंत सारें जीवन आश्रिताप्रमाणें कंठवायाला लाविलें होतें. मृत्युनंतर विदुराचें दहन केलें नाहीं, हा त्याच्या इराणीपणाचा पुरावाच आहे. या विदुरचरित्रानें जरथुस्त्री जनांना भारतीय जीवनांत जें हीन स्थान दिलें होतें, त्याचें शल्य त्यांच्या मनांतून काढून टाकण्याकरतांच महाभारतांत युधिष्ठिराच्या चरित्राला सर्वस्वीं जरथुस्त्री स्वरूप दिलें आहे. नाहीं तर एकाच महाकाव्यांत यमराजाच्या या दोघां प्रतिनिधींना स्थान देण्याचें कांहींच कारण नव्हतें. इतर कोणत्याहि देवाला महाभारतांत असें दुहेरी प्रतिनिधित्व मिळालेलें नाहीं.

महाभारतावरील जरथुस्त्री धर्माच्या प्रभावाच्या दृष्टीनें पाहतां युधिष्ठिरचारित्राइतकीच दुसरी महत्त्वाची कथा म्हणजे सर्पसत्राची कथा होय. महाभारतांत उल्लेखिलेल्या जनमेजयाच्या सुप्रसिद्ध सर्पसत्रापूर्वींहि सर्पसत्रें होत असत; पण तीं सर्पांच्या उन्नतीसाठीं होत असत. असल्या एका सर्पसत्राची बरीच माहिती पंचविंश ब्राह्मणांत आली आहे. असल्या सर्पसत्रांचा संताप येऊनच जरथुस्त्रानें आपल्या जनमेजयजातीय सर्पसत्राची कल्पना काढली असावी. 'दया तीचें नांव भूतांचें पाळण । आणीक निर्दळण कंटकांचें' हा नियम जरथुस्त्राच्या अनुयायांना कडकडीतपणें पाळावा लागत असे. कुत्रा, गाय, शेळी इत्यादि उपयुक्त प्राणि पाळणें आणि त्यांचें संगोपन करणें, उलटपक्षी मुंग्या, उंदीर, साप,

विंचू, लांडगे, वाघ इत्यादींचा संहार करणें आणि त्यांचीं आश्रयस्थानेंहि नष्ट करणें हें त्यांचें धार्मिक व्रतच आहे. या संहाराला आणि आश्रयस्थानें नष्ट करण्याला ख्रफ्सत्रस् अशी अवेस्त्यांतील संज्ञा आहे. हा शब्द सर्पसत्र या शब्दापासूनच उद्भवला आहे, हें तज्ज्ञांना लगेच कळेल. अतज्ज्ञांना व्युत्पत्ति समजावून देण्याचा प्रयत्न करणें हें अरसिकांना कवित्वनिवेदन करण्याहूनहि अधिक दुःखद असल्यानें तें टाळणें भाग आहे. ख्रफ्सत्रस् या शब्दाचा अवेस्त्यांतून आणि इतरत्रहि केलेला उपयोग पाहूनच ही व्युत्पत्ति निश्चित केली आहे, इतकें म्हटलें तरी सध्यां पुरें आहे.

सर्पांच्या उन्नतीसाठीं सर्पसत्रें करणाऱ्या भारतीयांना सर्पसत्रांची इराणी कल्पना रुचणें शक्यच नव्हतें. विशेषतः आर्यावर्तांत स्वतःला नागकुलोत्पन्न म्हणविणारीं शेकडों कुलें असल्यामुळें त्यांच्या भावनांना मान देण्याकरतां तरी जरथुस्त्री धर्मानें प्रभावित झालेल्या लोकांच्या सर्पद्वेषाला आळा घालणें महाभारतकारांना आवश्यक होतें. हें कार्य त्यांनीं जरथुस्त्री लोकांचा मित्र जो कुत्रा, त्याच्याच शापानें, त्यांचे शत्रु जे सर्प त्यांचा सर्वनाश टाळल्याचें दाखवून जरथुस्त्रांच्या तंगड्या त्यांच्याच गळ्यांत मोठ्या कुशलतेनें अडकविल्या आहेत. महाभारतकारांच्या या क्लृप्तीचें स्वारस्य अर्वाचीन वाचकांना समजण्याकरतां त्यांना अवेस्त्यांतील महापातकांची माहिती करून दिली पाहिजे. वेंदिदादमधील १५ व्या प्रकरणांत या महापातकांसंबंधीं जी माहिती आली आहे तिच्यांत शुद्ध बुद्धीच्या व्यक्तीचा बुद्धिभेद करणें हें पहिलें महापातक सांगितलें आहे. जनतेचा बुद्धिभेद न करण्यावरील भगवद्गीतेच्या कटाक्षाचें मूळ जरथुस्त्री धर्मांतच असल्याचें यावरून उघडकीला येतें. पण मौजेची गोष्ट ही कीं याच्यापुढेंच उल्लेखिलेलीं पापें कुत्र्याला तोंड भाजण्याइतकें कढत अन्न खावयाला घालणें, गरोदर कुत्रीला मारणें किंवा भय दाखविणें हीं आहेत. यानंतर रजस्वलेशीं

किंवा गर्भिणीशीं समागम करणें आणि अविवाहित मुलींना दूषित करणें या पापांचा उल्लेख आला आहे. या साऱ्या पापमालेवरून जरथुस्त्री पंथांत कुत्र्यांचें माहात्म्य किती होतें, हें फार चांगलें कळून येतें आणि दुखावलेल्या कुत्र्याच्या शापाचा सर्पसत्र बंद पाडण्यासाठीं उपयोग करण्याच्या महाभारतकारांच्या कल्पकतेचें कौतुक करावेंसें वाटतें.

खांडववनदहनाची कल्पनाहि मूळची इराणीच आहे. अवेस्त्यांतील 'रामयस्त' या प्रकरणांत औवर्शारानें जलदेवतेची प्रार्थना केली आहे कीं, 'आर्यांचें राज्य सलग व्हावें याकरतां अरण्य जाळणाऱ्या कवि हुस्रव राजाच्या तावडींतून मला एकट्याला वांचीव, मग इतर साऱ्या अनार्यांचा त्या वणव्यांत नाश झाला तरी चालेल.' ही प्रार्थना वाचली कीं खांडववनांत राहणारा तक्षक आणि त्यांचें रक्षण करणारा इंद्र यांचें स्मरण झाल्यावांचून राहात नाहीं. गदापर्वांतील दुर्योधनाच्या ऱ्हदप्रवेशाची कथा अवेस्त्यांतील अफ्रासियाबच्या ऱ्हदप्रवेशावरून उचलली आहे, याविषयीं मला स्वतःला यत्किंचित् शंका नाहीं. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या दिवशीं म्हणे दुर्योधन एकाएकीं ऱ्हदांत शिरून जलस्तंभन करून आंत लपून राहिला! इतकी माया जाणणाऱ्या दुर्योधनावर मयसभेंतील भिंतीवर कपाळ आपटून घेण्याची किंवा पुष्करिणींतून निमग्न होण्याची पाळीच आली नसती. आपल्या सर्व सैन्याचा विनाश झाल्यानंतर लपून राहण्याचा प्रयत्न करणें हें त्याच गदापर्वांत 'स्वंततर कवण मजहुनी ? आतां कर्तव्य राहिलें काय ?' असें पांडवांना तेजस्वी उत्तर देणाऱ्या दुर्योधनाच्या स्वभावाशीं विसंगतहि आहे. पण तीच घटना अफ्रासियाब राजाच्या एकंदर चरित्राशीं अतिशय सुसंगत आहे. यावरून ऱ्हदप्रवेशाच्या कल्पनेचें मूलस्थान हिंदुस्थानांत नसून इराणांतच होतें, इतकें चांगलें कळून येतें. अफ्रासियाबच्या कथेंतील एका परंपरेंत त्यानें एका सरोवराच्या मध्यभागीं एक खांब उभारून त्याच्यावरच आपला राजप्रासाद बांधिला होता, अशी माहिती आढळते. तिचाच प्रतिध्वनि परीक्षित

राजाच्या एकस्तंभी निवासांत महाभारतांतून ऐकूं येतो. स्तंभावर वसति करण्याची कल्पना इजिप्त–इराणासारख्या हिंदुस्थानाच्या पश्चिमेकडील देशांतलीच आहे, येथली नव्हे. याव्यतिरिक्त सप्त चिरंजीवांची कल्पना अवेस्त्यांतीलच आहे. रामाचा सेवक वायु असल्याचा उल्लेख अवेस्त्याच्या 'रामयस्त' प्रकरणांत आला आहे. अभिमन्यूच्या मृत्यूनंतर धर्मराजाला सांगितलेल्या षोडशराजीय आख्यानाची कल्पना इराणीच आहे, इतकेंच नव्हे तर त्या विषयावर 'आओगामेनिका' नांवाचा झेंद भाषेंतील उताऱ्यांच्या आधारानें पह्लवी भाषेंत लिहिलेला ग्रंथ अद्यापहि उपलब्ध आहे. या साऱ्या उदाहरणांवरून महाभारतांतील कथांचा अवेस्त्यांतील आख्यानांशीं किती निकटचा संबंध आहे, याची वाचकांना थोडीशी कल्पना येईल. या प्रश्नाची सविस्तर चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. महाभारताचा रचनाकाळ बौद्ध धर्माच्या उदयापूर्वीं शेंकडों वर्षें आणि जरथुस्त्री पंथाच्या उदयानंतरचा आहे, इतकें जरी अधिकारी विद्वानांना आणि विशेषतः त्यांच्यांतील भाषाशास्त्रज्ञांना कळावयाला लागलें तरी वेदाच्या काळासंबंधींहि त्यांना जपून लिहावें लागेल आणि टिळकदीक्षितांसारख्या ज्योतिष्यांच्या संशोधनाची उपेक्षा किंवा अवहेलना करण्याची प्रवृत्तिहि त्यांना सोडून द्यावी लागेल.

महाभारताची पहिली प्रत पाणिनीच्या पूर्वींची असावी, असें मानण्याला एक ऐतिहासिक गमक आहे. तें हें कीं महाभारताच्या रचनाकाळीं नरनारायणांची उपासना चालू होती आणि पाणिनीच्या काळीं तिचें अर्जुनवासुदेवांच्या उपासनेंत परिवर्तन झालें होतें. नरनारायणांपैकीं नारायणाची उपासना ही हरि, सात्वत इत्यादींच्या कुलधर्मांत समाविष्ट होऊन आपल्या देशांत चिरंतन झाली. पण नरोपासनेची गोष्ट तशी नाहीं. भारतवर्षांत नरकुलांतील लोकांची कधीं मोठ्या प्रमाणावर वसति न झाल्यामुळें म्हणा, किंवा नर आणि नारायण यांच्या उपासनेंत फारसा भेद नसल्यामुळें बहुसंख्य नारायणांत नरकुल

मिसळून गेल्यामुळें म्हणा नरोपासनेचें वैशिष्ट्य लौकरच नष्ट झालें आणि पुढें त्या नराचा अवतार मानलेला अर्जुनहि वासुदेवाच्या तोडीचा देव न राहतां अल्पावधींतच त्याचा सखा, इतकेंच नव्हे तर संरक्षित सखा बनला. नरकुलाचे अवेस्त्यांत केव्हां केव्हां उल्लेख आढळतात. इराणांतील एक अतिप्रसिद्ध पौराणिक राजा कवि हुस्रव हा नरकुलांतील अग्रेरथाचाच पुत्र होता. यावरून त्या देशांत नरकुलाचें प्राचीन काळीं किती माहात्म्य होतें, याची नीट कल्पना येते; आणि त्या देशाशीं असलेला भारतवर्षाचा संबंध कमी झाल्यावर नरकुलाचा विसर आपोआपच कसा होत गेला हेंहि कळून येतें. नराप्रमाणेंच नारायणाचीहि भारताला विस्मृति पडली असती. पण कुरूंचा आणि नारायणांचा अतिशय निकटचा संबंध असल्यानें ही गोष्ट घडून आली नाहीं. कुरुकुल आणि नारायण यांच्या परस्परसंबंधांची यथार्थ कल्पना कुरुराजाच्या तपावरून येते. कुरुराजाचें तप हें जमीन नांगरण्याचें होतें आणि नारायणीयोपाख्यानांत स्वतः नारायणानेंहि 'कृषामि मेदिनीं पार्थ, भूत्वा कृष्णायसो हलः' म्हणजे 'नांगराचा काळाकुट्ट लोखंडी फाळ होऊन मी जमीन नांगरतों, यामुळें मला कृष्ण नांव प्राप्त झालें आहे,' असें सांगितलें आहे. यावरून असें दिसतें कीं नारायणीय पंथानें कृषीला धार्मिक दृष्ट्या अतिशय महत्त्व दिलें होतें आणि हें महत्त्व कुरूंच्या नेत्यांनाहि मान्य होतें. याच पंथांतील उपरिचर वसु राजानें यज्ञांत पशूंच्या ऐवजीं वनस्पतींचेच हविर्भाग दिले, असें जें वर्णन त्याच उपाख्यानांत आलें आहे, तें सुद्धां अहिंसेच्या बुद्धीनें नसून कृषीचें महत्त्व जनमनावर बिंबविण्याच्या दृष्टीनेंच लिहिलें असावें. भारतीय युद्धांत नारायणगण कौरवांच्या पक्षानेंच लढला, या घटनेवरूनहि कुरु आणि नारायण यांचे संबंध किती निकटचे होते, हें कळून येतें. नारायण हा कृषीचा पुरस्कर्ता होता; पण कृष्ण केवळ पशुपाल होता. त्याला नारायणाचा अवतार बनविण्याची कल्पना नारायणाच्या अनेक नामांपैकीं कृष्ण या वर उल्लेखिलेल्या नांवावरून मागाहून सुचलेली.

आहे. कृष्णाला नारायणाचा अवतार बनविल्यानंतरसुद्धां त्यानें आपल्या गोपालचरित्राच्या प्रभावानें नारायणीय पंथाची मूळची उपासना मारून टाकलीच. नारायणाची उपासना आपल्या पूर्ण प्रभावानें भारतवर्षांत विराजत असतांना महाभारताची पहिली प्रत लिहिली गेली असली पाहिजे.

विद्वत्समाजांत इतर सर्व शास्त्रांपेक्षा इतिहासशास्त्राचें अज्ञान अधिक आहे. त्यामुळें इतिहासांतील एका घटनेचा दुसऱ्या घटनेशीं असलेला अविच्छेद्य संबंध विद्वानांच्याहि लक्ष्यांत येत नाहीं. उषा, अग्नि यांसारख्या निसर्गदेवतांचें इंद्रविष्णुनारायणादि नरदेवतांतून होणारें रूपांतर, ऋक्षवानरादि मानवेतर प्राण्यांना आपले पूर्वज, अतएव पूज्य मानणाऱ्या टोळ्यांचें कुरुपांचालादि भौगोलिक राष्ट्रांत होणारें परिवर्तन, निरनिराळया वंशांचीं भ्रमणें, कृषीचा शोध, एकछत्री साम्राज्यांची स्थापना या साऱ्या घटना बऱ्याच अंशीं एककालीन असतात, असा एक इतिहासशास्त्राचा सिद्धांत आहे. या सिद्धांताची चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. या सिद्धांताच्या अनुरोधानें नरनारायणांचा भारतांत प्रवेश केव्हां झाला असावा, याची चिकित्सा मात्र या स्थळीं करावयाची आहे. नरनारायणांच्या इतिहासाचा मिटान्नी लोकांच्या इतिहासाशीं निकटचा संबंध असल्यानें प्रथम त्यांचा परिचय करून घेतला पाहिजे.

पाश्चात्य पंडितांच्या मतें ऋग्वेदाचा काळ बऱ्याच अंशीं सीरियांतील मिटान्नी नांवाच्या एका प्राचीन राष्ट्राच्या इतिहासावर अवलंबून आहे. त्यांच्यांतील इतिहासलेखक समजतात कीं ख्रि. पू. १३८० च्या सुमाराला मिटान्नीच्या राजानें त्याच्या उत्तरेच्या हिटाइट अर्थात् हट्टीकुलाच्या राजाशीं संधि केला असतां त्यांत इंद्र, मित्र, वरुण, नासत्य या आर्यांच्या देवांचा जो उल्लेख केला आहे, तोच इतिहासाच्या रंगभूमीवर आर्यांचा प्रथम प्रवेश होय. त्यांच्यांतील भाषाशास्त्रज्ञ असा प्रचार करीत आहेत कीं मिटान्नीच्या लेखांतील संस्कृत शब्दांचीं रूपें

हींच त्यांचीं सर्वांत प्राचीन रूपें असून ऋग्वेदाच्या रचनेचा काळ तत्पूर्वी जाऊंच शकत नाहीं. यांत दुर्दैवाची गोष्ट ही कीं ज्या मिटान्नींच्या इतिहासावरून इतकीं महत्त्वाचीं अनुमानें काढलीं जात आहेत, त्यांच्या इतिहासाची नुसती रूपरेषासुद्धां या पंडितांना माहीत नाहीं. याकरतां या ठिकाणीं आपल्याला त्यांच्या इतिहासाचा संक्षेपानें परिचय करून घेतला पाहिजे आणि मग त्या साऱ्या इतिहासावरून कोणतीं न्याय्य अनुमानें निघूं शकतात, याचा विचार केला पाहिजे.

मिटान्नींच्या इतिहासासाठीं मला सध्यां तरी केंब्रिजच्या प्राचीन इतिहासावरच अवलंबून राहणें भाग आहे. या ग्रंथावरून असें समजतें कीं ख्रि. पू. २५०० च्या सुमाराला असीरिया देशावर राज्य करणारे उशिपया आणि किकिया हे राजे मिटान्नी जनपदांपैकींच होते. प्राचीन ग्रीक इतिहासकारांच्या मतानें इराणच्या उत्तरभागांतील मीडिया प्रांतांतल्या मद्, मद्र, मीढ इत्यादि नांवांनीं संबोधिल्या जाणाऱ्या कुळाच्याच एका शाखेनें मेसापोटेमियांत एक मोठा उपनिवेश स्थापिला होता, त्यालाच पुढें मिटान्नी हें नांव मिळालें. ग्रीक इतिहासकारांची ही माहिती चूक असावी, अशी शंका घेण्याला कांहींहि कारण नाहीं. असीरियांतील अतिप्रसिद्ध साम्राज्य जरी सेमेटिक वंशाच्या लोकांचें असलें तरी तेथील ऐतिहासिक काळाच्या प्रारंभींची वसति सुमेरवंशीय लोकांचीच होती, असें एडुआर्ड मायरप्रभृति सर्व नामांकित इतिहासकारांचें मत आहे. सुमेरी लोक आर्यच होते आणि सेमेटिक वंशाच्या लोकांशीं आर्यांच्या कलहाला सुमेरच्या इतिहासापासूनच प्रारंभ होतो, असें नवीन संशोधनानें अधिकाधिक स्पष्ट होऊं लागलें आहे.

हे सुमेरवंशीय लोक कोठून आले होते, याची मोहिती 'जुळया नुंद्या' या इंग्रजी ग्रंथांत मि. सेटन लॉइड यांनीं थोडक्यांत दिली आहे. तीच येथें उतरून घेणें सोयीचें होईल. "The numerous innovations of the Uruk period and the abrupt

change in the character of such a universal commodity as pottery at once suggested that that its beginning corresponded to the advent of a new group of foreign people into Iraq. On this assumption an investigation was made of their possible origin, and it was soon satisfactorily demonstrated that they came from what is now Central Turkey or Anatolia. Here pottery of the same quality and shapes as those of Warka was found and other evidence of a migration. An Intermediate stage in the passage of these 'Uruk' people from the mountains to the plain was most interestingly revealed in 1939 by yet another Iraq Government excavation at the foot of the Sinjar hills North-West of Mosul. Here was a predynastic village where the grey type of burnished Uruk pottery was almost exclusively in use, where-as in the stratum immediatly below painted Al-ubaid pottery was the rule." (Twin Rivers' P. 6-7)

याव्यतिरिक्त आणखीहि एका मार्गानें सुमेरी संस्कृतीच्या जनकांनीं आपल्या कर्तृत्वक्षेत्रांत प्रवेश केला असावा, असें इतिहासकारांचें मत आहे. मि. पॅट्रिक कार्लटन हे आपल्या 'भूमिगत साम्राज्यें' या ग्रंथांत म्हणतात. 'The Sumerians are usually supposed to have entered Babylonia from the east,and there is sound evidence for this. Their word for 'east,'' mountain', and 'country' is the same (kur). Further they conceived their gods to dwell on mountains, and so indispensable a part was played in there worship by 'high places' that on the level Babylonian plain, they were forced to provide their temples with artificial mountains.' ('Buried Empires' P. 31-32)

या दोन उताऱ्यांतून दोन विभिन्न मार्गांनीं सुमेरी संस्कृतीच्या जनकांनीं बाबिलोनिया प्रांतांत प्रवेश केल्याची माहिती आली आहे.

अर्वाचीन तुर्कस्थानांतील ॲनाटोलिया प्रांतांतून येऊन सिंजार टेकड्यांच्या प्रदेशांत कांहीं काळ स्थायिक होऊन शिंजार हें नांव धारण करणाऱ्या एका टोळीनें टैग्रिसयुफ्रेटिस नद्यांच्या कांठानें खालीं सरकून इराणाचें आखात गांठलें. उलटपक्षीं त्याच कुळांतील दुसऱ्या एका टोळीनें कॉकेशियांतून इराणांत प्रवेश करून पश्चिम इराणांतील सुशियाना प्रांत व्यापिला; आणि नंतर पश्चिमेकडे वळून युफ्रेटिस नदीच्या मुखाकडे उपनिवेश स्थापिण्याला प्रारंभ केला. ऐतिहासिक काळांतील सुमेरी संस्कृति ही सुशियाना प्रांतांतील संस्कृतीच्या अनुकरणानेंच उद्भवली आणि वाढली, ही वस्तुस्थिति आतां संशोधकांच्या लक्ष्यांत येऊं लागली आहे. ख्रि. पू. १५००० वर्षांपासूनचे अवशेष सुसा नगरींत सांपडले असल्यानें तेथील संस्कृतीचें प्राचीनत्व आतां सर्व संशोधकांना पटलें आहे. या सर्वमान्य गोष्टींचा उल्लेख केल्यानंतर वैदिक आर्यांच्या इतिहासाच्या दृष्टीनें मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं सुसाची संकृति ही अत्रिकुलाची संस्कृति होती आणि त्यांचा शिंजारांशीं निकट संबंध होता.

अत्रि आणि सुसा यांचा परस्परांशीं असलेला निकट संबंध अन्यत्र वर्णिला आहे. तरीसुद्धां विवेचनसौकर्याकरतां त्याचा येथें संक्षपानें उल्लेख करणें आवश्यक आहे. अत्रिकुलांतील व्यक्तींच्या व्यतिरिक्त इतर कोणालाहि सूर्यग्रहणाचें ज्ञान नाहीं, या वेदांतील वचनावरून आणि माध्यंदिनसवनाच्या प्रसंगीं असुरांनीं अंधार करूं नये याकरतां अत्रिकुलोत्पन्नाला सुवर्णदक्षिणा अर्पण करण्याच्या शतपथांत उल्लेखिलेल्या परंपरेवरून, त्या कुलांत पुरातन कालापासून ज्योतिर्विद्येचा अभ्यास चालू असल्याचें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें भारतीय ज्योतिषपरंपरेंत सुसा नगरीचा उल्लेख आढळतो आणि अत्रिमंडलांतील सूक्तकर्त्यांत सस आत्रेय असें नांवहि आढळतें. या सर्व माहितीवरून अत्रींचा सुसा नगरीशीं असलेला संबंध व्यक्त होतो. सुमेरमधील इतर सर्व संस्कृतीप्रमाणेंच तेथील ज्योतिर्विद्याहि सुसा नगरीकडून मत्स्यांना प्राप्त झाली असणें अगदीं

स्वाभाविक आहे आणि ज्योतिर्विद्येच्या अध्ययनांत अग्रेसर असलेल्या अत्रींकडूनच ती सुमेर देशांत गेली असणें हें विकासवादाच्या नियमांना धरून आहे. सुसामधील अत्रि आणि सुमेरमधील शिंजार यांचा परस्परांशीं निकट संबंध होता असें 'यथाचित् कण्वं आवतं प्रियमेधं उपस्तुत अत्रिं शिंजारं अश्विना' (८-५-२५) या वचनावरून सांगतां येतें. पण हा पुरावा कित्येकांना पुरेसा वाटणार नाहीं. याकरतां आतां परत मिटान्नींच्या इतिहासाकडे वळलें पाहिजे.

शिंजारच्या टेकड्या या असीरियाच्या उत्तरेला मिटान्नीच्या वाटेवर आहेत. असीरियाबाबिलोनमधील शिंजारांची सत्ता नष्ट झाल्यानंतर ख्रि. पू. दुसऱ्या सहस्रकांत मिटान्नींच्या राज्याचा बोलबाला होऊं लागतो. याचा अर्थ असा होतो कीं असीरियांत सेमेटिक वंशाचें प्राबल्य झाल्यानंतर आर्य शिंजारांनीं स्थानत्याग करून मिटान्नींत नवें राज्य स्थापिलें. पुढें कांहीं शतकानंतर मिटान्नींचें इजिप्तशीं वैर उद्भवल्यामुळें त्यांना तोहि देश टाकून आराराट् पर्वताशेजारीं आर्मेनियांत नव्यानें राज्यस्थापना करावी लागली. या आर्मेनियांतील राष्ट्राला असीरियन राजांनीं आणि इतिहासलेखकांनीं 'उरअत्रि' ही संज्ञा दिल्याचे निदान तीन उल्लेख उपलब्ध आहेत. ही संज्ञा त्यांनीं चुकीनें लाविली असावी, असें पाश्चात्य इतिहासकारांचें मत आहे; पण त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. या आर्मेनियांतील राज्याला त्यांनीं दिलेली संज्ञा उरार्तु ही उर अत्रि या शब्दापासूनच उद्भवली आहे, हें उघड आहे. या संज्ञेवरूनहि शिंजार, मिटान्नी आणि उरार्तु यांचा अत्रिकुलाशीं असलेला संबंध स्पष्ट होतो.

या विवेचनांत भारतीय इतिहासाशीं संबद्ध असलेल्या आणखी एका महत्त्वाच्या माहितीचा उल्लेख येऊं शकला नाहीं. केंब्रिज प्राचीन इतिहासाच्या दुसऱ्या खंडांत १९९ पानावर पुढील उल्लेख आहे. 'The land of Mitanni very closely corresponded to the Naharin

and the Hanigalbat of Egyptian and Assyrian sources respectively; it was distinct from Carchemish, Aleppo, Arzawa, Nukhashshi, but closely connected with the Harry, who had their own language.' म्हणजे मिटान्नी देशांतच इजिप्तचे लोक ज्याला नहरिन् आणि असीरियाचे लोक ज्याला हनीगल्बत म्हणतात, तो प्रांत होता. या प्रांताचा हरी कुळाशीं अतिशय निकटचा संबंध होता. हरींची भाषा मात्र भिन्न होती. या वाक्यांत उल्लेखिलेल्या नहरिन् शब्दाची अक्षरवाटिका Naharain अशीहि लिहिली जात होती, हें कळल्यानंतर त्याचा भारतीय नारायणाशीं संबंध न जोडणारा संशोधक आपल्या देशांत दुर्मिळ असेल, अशी आशा आहे. असीरियाच्या पश्चिमेला जसें नारायणाचें अस्तित्व होतें, तसेंच त्याच्या उत्तरेला नैरी अर्थात नरकुलाचें निवासस्थान होतें. या नरकुलाशीं असीरियाच्या निकराच्या लढायाहि होत असत. या माहितीवरून भारतांतील नरनारायणांच्या शाखा असीरियाच्या उत्तरपश्चिमेला ख्रि. पू. १२०० किंवा १४०० च्या सुमाराला राहात होत्या, असें निश्चितपणें कळतें. यांपैकीं नारायणांचा विध्वंस प्रथम वर उल्लेखिलेल्या शतकांतच इजिप्तच्या सम्राटांनीं केला आणि त्यानंतर ख्रि. पू. ९०० च्या सुमाराला असीरियाच्या नवोदित साम्राज्याच्या रथाखालीं ते पूर्णपणें चिरडले गेले. त्यांच्यामागून लौकरच नरांचीहि तीच वाट लागली. मात्र त्यांच्यापैकीं कांहीं जणांना उरार्तु देशांत आश्रय मिळाला असावा. नारायणांच्या पाठोपाठच इजिप्तच्या अधिपतींनीं मिटान्नींचा कांटा काढला होता. त्यामुळें ख्रि. पू. दुसऱ्या सहस्रकानंतर मिटान्नींचें इतिहासांत नांवहि ऐकूं येत नाहीं.

ही सर्व माहिती मराठी वाचकांना अभिनव आणि मनोरंजक असली तरी तिचा वेदकालनिर्णयाशीं संबंध कसा येतो, असा प्रश्न त्यांच्या मनांत सहजच येईल. त्याचें उत्तर देण्याचा आतां प्रयत्न केला पाहिजे. वरील इतिहासावरून असें अनुमान निघतें कीं ख्रि. पू. १५०० नंतरच्या

काळांत मिटान्नीच्या नारायणांना हिंदुस्थानकडे वळण्याला मुळींच सवड झाली नसावी. हेंच अनुमान मिटान्नी कुळालाहि लागूं आहे. नरांची माहिती अत्यल्प असल्यानें त्यांच्याविषयीं निश्चितपणें लिहितां येत नाहीं. तथापि भारतीय परंपरेंतील नरनारायणांचा अविच्छेद्य संबंध पाहिला म्हणजे नारायणांवांचून ते कांहीं करूं शकतील, असें वाटत नाहीं. तेव्हां नारायणांच्या उत्कर्षाच्या काळांतच ते भारतवर्षाकडे वळले असावेत, असें स्वाभाविक अनुमान काढावें लागतें.

नारायणांच्या भारतावरील आक्रमणाचा काळ कोणता असावा यासंबंधीं अनुमान करण्याला केंब्रिज प्राचीन इतिहासांतील एका वाक्यानें थोडी दिशा दाखवून दिली आहे. खि. पू. १७०० च्या सुमाराला सीरियांतील लोकांनीं इजिप्तवर स्वारी करून तो देश जिंकला आणि तेथें कित्येक शतकें राज्य केलें. पुढें इजिप्तच्या लोकांनीं त्यांना आपल्या देशांतून हुसकून दिल्यानंतर त्यांनीं जर नारायण आणि मिटान्नी यांच्यावर स्वाऱ्या आरंभिल्या असल्या तर त्यावरून असें अनुमान निघतें कीं इजिप्तवरील स्वारींत या लोकांनीं भाग आणि कदाचित् पुढाकारहि घेतला असला पाहिजे. केंब्रिजच्या विद्वानांच्या या मार्मिक कल्पनेच्या अनुरोधानें विचार केला असतां खि. पू. १७०० पासून नारायणांना हिंदुस्थानाकडे वळण्याला सवड झाली नसावी, असें सरळ अनुमान काढावें लागतें. तेव्हां 'नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्' हे चरण लिहिण्याजोगी परिस्थिति भारतांत खि. पू. १७०० च्या पूर्वींच केव्हां तरी आली होती, असें म्हणणें प्राप्त आहे. या घटनेचा नक्की काळ कोणता हें सुमेरच्या इतिहासावरून सहज कळण्याजोगें आहे.

वेदांत शिंजारांना अश्विनीकुमारांनीं सहाय केल्याचा जो उल्लेख आढळतो, त्यावरून तेव्हां त्यांना बाबिलोनी सेमेटिक लोकांचें भय उत्पन्न झालें असल्याची स्पष्ट सूचना मिळते. अत्रिमंडलांतील ५-१९ या सूक्तांत अत्रींनीं वव्रि अर्थात् इराणी आर्यांना बवरी या नांवानें परिचित

असलेली बाबिलोन नगरी जाळून टाकिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. खि. पू. १७६० च्या सुमाराला कशु लोकांनीं बाबिलोन नगरी व्यापिली आणि तेथें चार पांच शतकें राज्य केलें. पण ऋग्वेदांतील कशूंच्या उल्लेखावरून तेव्हां ते बाबिलोनचे अधिपति होते, असें दिसत नाहीं. त्यावरून असें अनुमान निघतें कीं कशूंनीं बाबिलोनमध्यें साम्राज्य स्थापण्याच्या पूर्वीं कशूंचा उल्लेख करणाऱ्या ऋग्वेदांतील सूक्तांची रचना झाली असली पाहिजे. खि. पू. १७६० च्या पूर्वीं बाबिलोन जिंकून तेथें आर्यांनीं राज्य केल्याचा एकच ऐतिहासिक उल्लेख आढळतो. तो म्हणजे पहिल्या सार्गोनच्या निधनानंतरच्या शतकांत गुतिउम या नांवानें इतिहासांतून प्रसिद्ध असलेल्या आर्यांनीं बाबिलोनमध्यें सुमारें १२५ वर्षें राज्य केल्याचा उल्लेख होय. गुतिउम् लोकांच्या या राजवटीचा प्रारंभकाळ हाच दाशराज्ञयुद्धाचा आणि ऋग्वेदांतील पुष्कळशा सूक्तांच्या रचनेचा काळ होय. गुती लोक आर्य होते कीं नाहीं याविषयीं अनेकांनीं संशय व्यक्त केला आहे. पण ' जुळ्या नद्या ' या ग्रंथांतील गुती राजांच्या नामावळींत अनेक आर्य नांवें आढळतात, त्यांपैकीं सर्वांत स्पष्ट म्हणजे अकरावें कुरुम् अर्थात् कुरु राजाचें नांव होय. या नांवांतील अंतिम म् हा केवळ बाबिलोनी प्रत्यय आहे. असलीं म् प्रत्ययान्त नांवें मद्रासेकडे हल्लीं तितकीं असल्यानें त्या प्रत्ययाकडे पाहून भारतियांना बुचकळ्यांत पडण्याचें कांहींच कारण नाहीं. तरी सुद्धां एका हिंदी लेखकानें या कुरुम्चें कूर्म असें संस्कृतीकरण केल्याचें माझ्या पाहण्यांत आलें आहेच. गुती लोकांच्या बाबिलोनमधील राजवटीचा काळ इतिहासाचार्य डॉ. टॉयनबींनीं खि. पू. २४२९ ते २३०६ असा दिला आहे. याच काळांत चायमान आणि सुदास यांची रावी ( परुष्णी ) नदीकांठींची लढाई झाली असली पाहिजे.

वरील विवेचनावर अधिकारी विद्वानांचा एकच आक्षेप येण्याजोगा आहे. तो म्हणजे हें सारें विवेचन Naharain आणि नारायण यासारख्या अक्षरसादृश्यावर आधारलेलें आहे. पण वस्तुस्थिति तशी

नाहीं. इराकी इतिहासांतील नरनारायणांचा जलाशीं संबंध आहे, ही गोष्ट त्या देशाच्या इतिहासकारांनीं मान्य केली आहे. आपल्या इकडेहि 'आपो नारा इति प्रोक्ता' हें वचन पुरेसें प्रसिद्ध आहे. पण या आक्षेपाला खरें उत्तर म्हणजे आक्षेपक ज्यांना केवळ अक्षरसादृश्यें म्हणतात, असलीं आणखी कांहीं समीकरणें त्यांच्या पुढें मांडणें हेंच होय. म्हणजे सरतेशेवटीं त्यांचा आवडता घुणाक्षरन्याय अतिश्रमानें निकामी झालाच पाहिजे. वर बाबिलोनचें राज्य जिंकणाऱ्या गुतिउम् लोकांचा उल्लेख आला आहे. हेच ऋग्वेदांतील गोतम असणें अगदीं शक्य आहे. यांच्याच शेजारीं नमर नांवाचा एक जनपद मानचित्रांत आढळतो. तोच ऋग्वेदांतील नर्मर असावा. दुसऱ्या मंडलाच्या १४ व्या सूक्तांत इंद्रानें नार्मराला म्हणजे नर्मराच्या पुत्राला मारल्याचा उल्लेख आला आहे. पहिल्या मंडलांतहि दीर्घतमा ऋषीच्या ( यालाच पुढें गोतम संज्ञा मिळाली हें अधिकारी विद्वानांना आठवत असेल ) एका सूक्तांत 'आ यः पुरं नार्मिणीम् अदीदेत् अत्यः कविः नभन्यो न अर्वा।' (१–१४९–३) म्हणजे अग्नीनें नार्मिणींच्या नगरावर उज्ज्वल प्रकाश पाडला, अर्थात् तें नगर जाळलें, असा उल्लेख आला आहे. हा उल्लेख गुतिउम् आणि नमर यांच्या शेजारधर्माला अनुरूपच आहे! हाच दीर्घतमा (१–१२२–१५) दुसऱ्या एका सूक्तांत 'चत्वारो मा मशर्शारस्य शिश्वः त्रयो राज्ञः आयवसस्य जिष्णोः।' अशा आपल्याला उपद्रव देणाऱ्या मशर्शार आणि आयवस यांच्या मुलांचा उल्लेख करतो. यांपैकीं मशर्शार हे नमरांच्या उत्तरेला असलेले मुशशीर होते, हें उघड आहे. मुशशिरांच्या ईशान्येला मन्नाइ नांवाचा जनपद आढळतो. पहिल्या मंडळांत अगस्त्याला मान्य आणि मांदार्य अशीं नांवें लाविलीं आहेत. यांपैकीं मान्य नांवाचा मन्नाईशीं संबंध असणें शक्य आहे. ( यस्न १७-७२ ) मान्य हें अवेस्त्यांतहि एका देवदूताचें नांव आहे. असीरियाच्या राजांनीं शबरींचा विस्तृत प्रदेश

जिंकल्याचें उल्लेख इतिहासांत अनेक आहेत. त्यांचा कण्वकुळांतील सोभरींशीं संबंध असावा, असें इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्लीतून कर्नाटकाच्या श्रीकंठशास्त्री या विद्वानांनीं आधींच सुचविलें आहे. (१९३६ सप्टेंबर) अत्रिशिंजारांप्रमाणेंच कण्वांचेंहि अश्विनीकुमारांनीं रक्षण केलें होतें, हें वर आलेंच आहे. त्या अवतरणांतील प्रियमेधांचा तेवढा शोध करावयाचा राहिला आहे. त्यांच्या प्रकरणांत मात्र घुणाक्षरन्यायाचा उपयोग लेखकाला होण्याचा संभव दिसत नाहीं. कारण प्रियमेध या शब्दाशीं बहुतांशीं जुळणारा देश शिंजारांच्या शेजारीं अजून सांपडला नाहीं. त्यांच्या उत्तरेला शुप्रिय नांवाचा देश आढळतो, त्याचा कदाचित प्रियमेधांशीं संबंध असूं शकेल, पण त्याविषयीं आग्रह धरण्याची प्रस्तुत विवेचनाला मुळींच आवश्यकता नाहीं. आणखीहि कांहीं अक्षरसादृश्यें अधिकारी विद्वानांच्या निदर्शनाला आणण्याचें काम अजून राहून गेलें आहे. श्री. सदानंद दीक्षित यांच्या 'मातृदेवता' ग्रंथाच्या २३५ पानावर हट्टी लोकांच्या भाटांत लूश लोकांचेंहि नांव आहे. याच लुश कुळाचें नांव धारण करणाऱ्या धानाकाचीं दहाव्या मंडलांत दोन तीन सूक्तें आहेत. या लुशाकडे जावयाला निघाल्याबद्दल इंद्राचे कुत्सानें फार हाल केले, अशी कथा बृहद्देवताकार सांगतात. असीरियाच्या पाश्चिमेला मर्कसी नांवाचा जनपद आढळतो. मर्क आणि शंड हे भृगुकुलोत्पन्न असून असुरांचे पुरोहित होते, अशी वैदिक परंपरा आहे. हीं सारीं नामसादृश्यें केवळ काकतालीय न्यायानें, नव्हे घुणाक्षरन्यायानें उद्भवलीं आहेत, असें समजणाऱ्यांनीं इतिहाससंशोधनाच्या नादीं लागण्यांत कांहींच अर्थ नाहीं. त्यांना इतिहासशास्त्राचें सांगणें आहे :

शूरोऽसि कृतविद्योऽसि दर्शनीयोऽसि पुत्रक ।
यस्मिन् कुले त्वमुत्पन्नो गजस्तत्र न हन्यते ॥

## “प्रत्येक तरुणास अनुकरणीय वाटण्यासारखें”

# – चाकोरीबाहेर –

### या पुस्तकाचे लेखक—

“श्री. अमरेन्द्र हे एक विचारवंत व अभ्यासू तरुण आहेत त्यांचें लिखाण, त्यांच्या मनाला पटणाऱ्या व स्पष्टपणें दृष्टींत सामावलेल्या वस्तुमात्रांतून निर्माण झालेलें असल्याकारणानें, तें जितकें वास्तवतापूर्ण तितकेंच जिवंत आहे हें स्पष्ट सांगून टाकलें पाहिजे. ध्येयनिष्ठ तरुण लेखकांची आज महाराष्ट्रांत अत्यंत गरज आहे. नवीन पिढींत ही उणीव भासूं नये म्हणून, तरुण लेखकांनीं अधिक विचारवंत व ध्येयवंत होण्याचा प्रयत्न करावयास हवा. असा प्रयत्न कसा करावा हें श्री. अमरेन्द्र यांनीं दाखवून दिलें आहे; आणि म्हणूनच त्यांचें हें लिखाण महाराष्ट्रांतील प्रत्येक तरुणास अनुकरणीय वाटण्यासारखें आहे.”

—“ तरुण भारत,” नागपूर ६–१२–४५

### आणि त्यांच्या याच पुस्तकाविषयीं–

“ एखादें कथानक वाचावें व रंगून जावें तसें आकर्षण त्यांनीं या पुस्तकांत निर्माण केलें आहे.”

—“ नवाकाळ,” मुंबई ९–१–४६

“ मलिन विचारांना आपल्या ओघानें, स्वच्छ विचारधारांनीं अधिक उजळा देणाऱ्या तत्त्वप्रवाहानें हें पुस्तक ओतप्रोत भरलें आहे.”

—“ विक्रम ” सांगली २६–१–४६

# राष्ट्रीय वाङ्मयाचा प्रभावी प्रवाह

## आपल्या ग्रंथालयाचीं भूषणें

सामान्य युवकाची असामान्य कथा
**प्रवासी राम**
ले. अमरेन्द्र : २ रु.

भारताच्या अखण्डत्वाचा संदर्भग्रंथ
**अखण्ड भारतच कां ?**
ले. 'हेमाग्रज' : २॥ रु.

प्रत्येक राष्ट्रसेवकाचा सोबती
**राष्ट्रसेवकाची शिदोरी**
सं. अमरेन्द्र नि गोपाल १। रु.

स्वतंत्र नि तेजस्वी विचारधारा
**चाकोरीबाहेर**
ले. अमरेन्द्र : १ रु.

कर्मयोगी तत्त्वज्ञानपर निबंध
**हिंदूंचा धर्मग्रंथ**
ले. मोहन करन्दीकर : ६ आ.

किशोर-वाङ्मय-बारा भाग
जुन्या-नव्या बहात्तर कथा
**आईची देणगी (भाग १,२)**
ले. गो. नी. दाण्डेकर : प्र. १२ आ.

स्फूर्तिप्रद नि अद्‌भुत चरित्र
**संताजी घोरपडे**
ले. ना. ह. पालकर : १२ आ.

तीन थोर राष्ट्रगुरूंची शिकवण
**आमचे राष्ट्रगुरु**
ले. गो. नी दाण्डेकर : १२ आ.

राष्ट्रीय कवितांचा संग्रह
**दीक्षा**
कवि यतीश : १॥ रु.

## वाटचालीवरील कांहीं आकर्षणें

वैशिष्ट्यपूर्ण कथासंग्रह
**गांवरान गोष्टी**
ले. चिं. य. मराठे

ऋग्वेदकालीन इतिहास
**दाशराज्ञ युद्ध**
ले. अ. ज. करन्दीकर

हुतात्म्यांचीं चरित्रें
**रुद्रवीणा**
ले. [illegible]

विज्ञानाची कलात्मक ओळख
**परमाणूंच्या युगांत**
ले. अमरप्रकाश गोखले

बुद्धीला आव्हान नि मनरंजन
**बहुरंगी करमणूक**
ले. रा. त्र्यं. रानडे

जुन्या-नव्या बहात्तर कथा
**आईची देणगी (भाग ३ रा)**
ले. गो.नी. दाण्डेकर : प्र. १२ आ.

**[illegible] साहित्य प्रकाशन**
आनन्दचेम्बर्स, आम्बराई, पुणे ४.

या ग्रंथाचे

—श्री. अ. ज. करंदीकर
व्यासंगी गृहस्थ असून
ज्योतिष, वैदिक व पौरा
संशोधन हे त्यांचे विशेष
विषय आहेत. बंगाली,
इत्यादि विविध भाषांश
चांगला परिचय आहे. तथ
प्रसिद्धीसाठीं नगारे वाजवि
वृत्ति नसल्यामुळें या व्यासं
विद्वत्तेचा बोलबोला अ
झालेला नाहीं. परंतु, के
नव्हे तर, हिंदी व इंग्रजी
त्यांच्या संशोधन-वाङ्मया
होणें आवश्यक आहे.

गांधीवादाचे कडवे
जहाल राजकीय तत्त्व
पुरस्कर्ते म्हणून ते महारा
परिचित आहेत.

त्यांचे लढाऊ राजक
मुस्लीम कॉन्स्पिरसी
दुसरी आघाडी इत्यादि
चंद्रप्रभा नांवाचें एक
प्रसिद्ध झालेलें असू
विक्रमादित्य हें पुस्तक
लिहावयास घेतलेलें आहे.